संगीत

# युगान्तर

नाटककार

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.

प्रकाशक

ग. म. वीरकर

गणेश महादेव आणि कंपनी

६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर

किंमत १ रुपया

कुळाच्या जन्मसिद्ध मोठेपणाचें युग संपून कर्तबगारीच्या व बुद्धि-सामर्थ्याच्या मापानें मोठेपणा मोजण्याचें नवें युग उदय पावल्याखेरीज आपल्या समाजाला भाग्याचे दिवस दिसावयाचे नाहींत, ही प्रस्तुत नाटकांतील मध्यवर्ती कल्पना आहे. या कल्पनेच्या आविष्करणाला सोईचें म्हणून एका काल्पनिक संस्थानाचें वातावरण पार्श्वभूमी-दाखल घेतलें आहे.

आपल्या गायनप्रभेनें ज्यांनीं मराठी
रंगभूमीचा प्रकाश अधिक उज्ज्वल
केला त्या माझ्या भगिनी

सौ. हिराबाई

यांस

माझी ही रंगभूमीची पहिली
सेवा मी प्रेमपूर्वक अर्पण करीत आहें.

—ना. सी. फडके

# युगान्तर



## अंक पहिला



### प्रवेश १ ला

**पद** ( यमन; एकताल )

**जनमानसमंदिरांत । विलसो रुचिरा प्रशान्त ।**
**मति स्वयंप्रकाशवती । मंगला, युगान्तरांत ॥ ध्रु० ॥**
**कुलसाधित वैभवांत । न दिसो महती कुणास ।**
**धृति, सेवा, कृति गुणांहीं । लाभो प्रभुता जनांत ॥ १ ॥**

[ तात्यासाहेब सरदारांच्या वाड्यांतील एका प्रशस्त व सुशोभित दालनांत **कान्ता** आणि **तारा** पूर्वोक्त पद म्हणत बसलेल्या आहेत. दोन वेळां पद म्हणून झाल्यावर त्या थांबतात.]

**कान्ता०**—तारे, कितीदांही म्हटलं हें पद तरी पुरेसंच वाटत नाहीं. एक प्रकारची अवीट गोडी उत्पन्न झाली आहे या पदांत, नाहीं !

**तारा०**—रविकान्तांची उघड स्तुति करायला तुला लाज वाटते, म्हणून त्यांनीं रचलेल्या या पदाची स्तुति करून घेते आहेस वाटतं !

**कान्ता०**—तुझं आपलं कांहीं तरीच. पदांत सगळे शब्द चांगले पडले आहेत, अन् प्रत्येक चरणांत एक प्रकारचा गोड नाद आला आहे असं तुला नाहीं वाटत ?

**तारा०**—मी नाहीं कुठं म्हणतें आहें ? पण पद करणाऱ्याचा नाद लागलेला अर ऽ म्हणजे मग त्याच्या चरणांच्या नादांत मन जास्तच

गुंतायला लागतं येवढंच माझं म्हणणं !—इश्श्, अशी चिडतेस काय ? पुन्हां म्हणूं आपण पद. एक दोन ठिकाणच्या ताना माझ्या गळ्यांत अजून नीटशा बसल्या नाहींत. हं, म्हण.

**कान्ता०**—नको. वाईट आहे तें पद.

**तारा०**—रागावलीस वाटतं ! बरं बाई, पद उत्तम आहे, सुंदर आहे, गोड आहे ऽऽ लिहून देऊं का ? ( दोघीही हंसतात. ) हं, म्हण.

[ त्या पद म्हणत असतांना **रविकान्त** येतो. त्याला पाहतांच दोघीही पद बंद करतात व उठून उभ्या राहतात. कान्ता त्याच्यासाठीं खुर्ची सरकवून मांडते. जरा वेळानें रविकान्त कान्तेकडे पाहतो व बोलूं लागतो.]

**रविकान्त**—हें काय ? गाणं कां बंद केलं ? माझ्या संगतीनं संगीताला बाध येत असेल तर मी जातों आपला !

**तारा०**—असं नाहीं कांहीं—

**रवि०**—मग म्हणा तर.

**तारा०**—कान्ता एकटीच म्हणेल. मला अजून नीटसं जमत नाहीं.

**रवि०**—बरं. तसं कां होईना.

[ असें म्हणून तो कान्तेकडे पाहून हंसतो. कान्ताही त्याच्याकडे पाहून हंसते व पद सुरू करते. ]

**कान्ता०**—( पद पुरें झाल्यावर रविकान्ताकडे पाहून ) मी कांहीं तसं शिकलें नाहीं. उगीच नाद आहे म्हणून म्हणायचं इतकंच.

**तारा०**—हा आपला हिचा विनय हो !

**रवि०**—विनय खराच ! आणि खरं म्हणाल तर आत्तां पद ऐकतांना मला दुहेरी आनंद होत होता. एक यांच्या कंठमाधुर्याचा आनंद, आणि दुसरा, माझं वेडंवाकडं पद यांच्या स्वरसौंदर्यानं नटलं या कल्पनेचा आनंद. आपलं मूल शेजारच्या एखाद्या संपन्न स्त्रीनं कौतुकानं नटवलेलं पाहून गरीब आईला जें सुख होत असेल तें मला झालं.

**कान्ता०**—छे ! ही भलतीच प्रशंसा झाली.

**रवि०**--भलतीच कशी ?—खरोखर, स्त्रीकंठांतले असे मधुर आलाप जर आपल्या समाजांत घरोघर ऐकूं येऊं लागले तर गायनकलेला ऊर्जितावस्था यायला वेळ लागायचा नाहीं.

**तारा०**—आणि केवळ समाजाच्या खोट्या सभ्यतेच्या कल्पनेवर पोसले जाणारे पुरुष गवई गर्वगलित होऊन गप्प बसतील !

**कान्ता०**—आमच्या तारेला आपला जिथं तिथं गर्व दिसत असतो, अन् गर्वहरण सुचत असतं. लहानपणापासून हिचा हा स्वभाव. श्रीमंतीच्या किंवा अधिकाराच्या गर्वानं फुगलेलं माणूस हिला दिसलं कीं कृतीनं किंवा एखाद्या शब्दानं तरी त्याला दुखवल्याखेरीज हिला चैन पडायचं नाहीं !

**तारा०**—अग, सत्तेचा दुरुपयोग दिसल्याबरोबर त्याविरुद्ध उठणारीं माझ्यासारखीं माणसं आहेत म्हणूनच जगाचं पाऊल पुढं पडत आहे. इतकंच नव्हे, विद्वानांपेक्षा असल्या माणसांचीच जगाला आज अधिक गरज आहे. लांब कशाला ? रविकान्तांचीच गोष्ट पहा. क्षयरोगाचा प्रतिबंध होईल अशी टोंचून घ्यायची लस त्यांनीं शोधून काढली आहे, अन् ती विलायतच्या शास्त्रज्ञांकडे पाठविली आहे. ती मान्य झाली तर त्यांना लाखों रुपयांचं बक्षीस मिळेल अन् ते अलौकिक शास्त्रशोधक ठरतील. प ा या आनंदपूरच्या साऱ्या प्रजेला ते प्रिय आहेत ते त्यांच्या या विद्वत्तेपेक्षां त्यांच्या स्वार्थत्यागासाठींच.

**रवि०**—वा ! हें कांहीं तरीच बोलणं. माझ्या हातून लोककल्याणासाठीं थोडाफार स्वार्थत्याग घडावा अशी माझी हौस आहे हें खरं; पण प्रत्यक्ष म्हटलं तर माझ्या हातून अजून कांहींच घडलेलं नाहीं.

**कान्ता०**—आम्रवृक्षाला स्वतःला आपल्या मोहोराचा सुगंध कधीं येत नाहीं. पण लोक तो नाहीं कसा म्हणतील ? शेजारच्या सुमतिपूर संस्थानच्या अधिपतींनीं तुमची योग्यता ओळखून तुम्हांला आपली दिवाणगिरी देऊं केली, त्या वेळीं तुम्ही जें उत्तर दिलंत तें लोकांच्या स्मरणांतून जाणं शक्य नाहीं. पैसा व अधिकार चालून आला असतां तो दूर लोटून, मला दुसऱ्या संस्थानची गादी मिळाली तरी नको, आनंदपूर ही माझी

जन्मभूमि आहे, तिची सेवा करण्यांतच मला अधिक धन्यता वाटेल असं उत्तर देणं निःसीम स्वार्थत्यागावांचून होत नाहीं.

**तारा०**—आनंदपुरांत तुमची सारी इस्टेट विनाकारण जप्त करण्यांत आली, तरी न डगमगतां लोकसेवा तुम्ही चालू ठेवलीत, अन् आता ही दारूबंदीची नवी चळवळ सुरू केलीत—या गोष्टी अलौकिक धैर्यावांचून होणाऱ्या नाहींत.

**रवि०**—माझ्या धैर्याची गोष्ट असो. पण तुम्ही ज्या सहानुभूतीनं बोलत आहांत ती पाहून तुम्हांला एक विनंति करायचा धीर मात्र मला येत आहे. ती विनंति करण्यासाठींच वास्तविक मी असा अनपेक्षित आलों, पण ( कान्तेकडे पाहून ) तुमच्या गाण्यांत त्याचा मला विसरच पडला. विचारूं का एक गोष्ट ?

**कान्ता०**—हं.

**रवि०**—आमच्या चळवळीच्या मार्गांतल्या अडचणी तुम्हांला माहींतच आहेत. संस्थानचे मालक स्वतः हजर असते अन् कारभारांत लक्ष घालीत असते तर जी काय सुधारणा हवी ती सरळ त्यांच्याजवळ हट्टानं मागणं एक वेळ लोकांना सोपं वाटलं असतं. पण दुर्दैव असं कीं आमचे महाराज वर्षांतले अकरा महिने विलायतच्या हवेंत घालवतात; आणि येतात ते बहुतेक परत जायचं तिकीट काढण्यापुरतीच त्यांना फुरसत असते.

**तारा०**—त्यांचं येणं म्हणजे वर्षांतनं एकदां येणारी संक्रान्तच.

**रवि०**—निदान त्यांच्या या विलायतच्या पोकामुळं नानासाहेबांसारख्या जुलमी सर्वाधिकाऱ्याची संक्रान्त लोकांच्या डोक्यावर बसली आहे खरी.

**कान्ता०**—युवराज अत्यंत न्यायप्रिय आणि कर्तबगार आहेत, तेव्हां त्यांच्या कारकीर्दीत हें जुनं युग खचित संपेल येवढी लोकांना आशेला जागा आहे हें तरी भाग्यच म्हणायचं.

**रवि०**—पण त्या भाग्यावर समाधान मानून आज नानासाहेबांनीं चालविलेली बेलगामी अरेरावी कां सहन करायची ? युवराज बुद्धिमान अन् न्यायदक्ष आहेत हें खरं. पण आज राजकुमार कॉलेजांत अभ्यास

करण्यापलीकडे त्यांच्या हातीं काय आहे ? नानासाहेबांना आज कोणी पुसता सवरता नाहीं. त्यांच्या जुलमाविरुद्ध त्यांच्याकडेच दाद मागण्याची पाळी आली आहे. अशा वेळीं लोकांचा पक्ष जितका सबळ होईल तितकी यशाची आशा अधिक. आणि याचसाठीं तुमची मदत मला मागायची आहे.

**कान्ता०**—ती कोणती ?

**रवि०**—आमच्या या चळवळीला स्त्रियांचाही पाठिंबा पाहिजे; अन् आनंदपूरच्या स्त्रियांचा पुढाकार तुम्ही दोघींनीं घ्यायला पाहिजे. आजच पहा. दारूबंदीची सुधारणा सारी प्रजा एकमुखानं मागत आहे हें दाखविण्यासाठीं आमची मोठी जाहीर सभा व्हायची आहे. ( खिडकीकडे बोट दाखवून ) ती पाहिलीत कशी गर्दी लोटली आहे ! पण त्या सभेपासून हांकेच्या अंतरावर आपल्या दिवाणखान्यांत बसण्याऐवजीं तुम्ही आमच्या सभेला आलांत—भाषणबिषण कांहीं नको, नुसत्या येऊन बसलांत तरी केवढं कार्य होईल. हीच विनंति करण्यासाठीं सभेला जातां जातां मी मुद्दाम आंत शिरलों. येतां सभेला ? [ कान्ता विचार करीत खालीं दृष्टि लावून बसते; व कांहीं वेळ कोणीच कांहीं बोलत नाहीं. ]— काय ?

**कान्ता०**—आजच नको. विचार करून काय तें मी ठरवीन अन् सांगेन.

**रवि०**—बरं, कांहीं हरकत नाहीं.

**तारा०**—अहो, हरकत नाहीं काय ? हिच्या या विचाराच्या तट्टाला तुम्ही मुभा दिलीत कीं संपलंच. तें एकदां अडलं म्हणजे पुढं सरणं कठीण. जुनी कारकीर्द संपून युवराज गादीवर आले तरी हिचा विचार संपेल कीं नाहीं शंका आहे.

**कान्ता०**—आमची तारा बोलण्यांत काय किंवा वागण्यांत काय, एकदम कळस गांठणारी आहे.

**तारा०**—म्हणूनच मावशीच्या मनाविरुद्ध तूं कांहीं केलंस कीं तारेची मावसबहीणच नव्हे तर सख्खी बहीण शोभतेस असं ती तुला म्हणते.

**रवि०**—आमची आई नेहमीं कौतुकानं म्हणते तें कांहीं खोटं नाहीं, कीं तुम्हां मावसबहिणींच्या जोडीसारखी जोडी पाहूं जातां मिळायची नाहीं.

सौंदर्य, शिक्षण, बुद्धिमत्ता, प्रत्येक बाबतींत तुम्हां दोघींना एकमेकींचीच उपमा साजते.

**तारा०**--पण आमची अशी जोडी ठरविणाऱ्यांच्या लक्षांत रहात नाहीं, कीं आमच्यांत घराण्याच्या बाबतींत मोठा फरक आहे ना. मी आपली एक सामान्य आईबापांची पोरकी मुलगी. कान्तेच्या घरीं तिच्याच बरोबर वाढलें खरी, पण माझी तिची लोकांनीं बरोबरी लावलेली तिला नाहीं रुचायची हो !

**पद** ( मांड; धुमाळी )

**सुखद नाहीं विफल तुलना ही । बावुगी ॥ ध्रु० ॥**
**थोरकुलांतिल धनिक-सुतेशीं । तुल्य कशी दुहिता अभागी ॥१॥**

किती झालं तरी कान्ता पहिल्या प्रतीच्या एका सरदाराची एकुलती एक मुलगी. इतर हजार बाबतींत कोणी आमची तुलना केली तरी चालेल, पण कुळाच्या बाबतींत तुलना झाली तर कान्तेला रुचायची नाहीं हं !

**कान्ता०**—तारे, थट्टेला जरा मर्यादा असूं दे. तूं माझी अशी थट्टा करावीस हें तुला बरं दिसतं ? माझी मनस्थिति तुला माहीत नाहीं का ? ( रविकान्ताकडे पाहून ) आमच्या सरदारी कुळाचा मला अभिमान वाटावा अशी एक तरी गोष्ट आमच्या घरात आहे का ? आमच्या पूर्वजांनीं पराक्रम गाजविले म्हणून आमचं कुल मोठं म्हणायचं. आज आमच्या कुळाची लोकांतली कीर्ति ऐकली तर फुटक्या भांड्यांच्या बदसुराहून कर्णकटु वाटते. हे विचार मनांत आले कीं वाटतं, हा वाडा सोडून लांब कुठं तरी जावं !

**तारा०**—जाणार आहेस हो, जाणार आहेस ! लवकरच जाणार आहेस ! पण असल्याच दुसऱ्या एका वाड्यांत जाऊन पडणार आहेस येवढंच काय तें.

**रवि०**—( आश्चर्यानें ) म्हणजे ?

**तारा०**—तुमच्या नाहीं आलं लक्षांत ?

**रवि०**—नाहीं. मी नाहीं समजलों.

**तारा०**—तुम्हांला माहीत नाहीं तर—?

**रवि०**—काय तें—?

**तारा०**—पहिल्या प्रतीचे सरदार, श्रीमंतांचे आप्त, सध्यांचे सर्वाधिकारी नानासाहेब यांच्याशीं आमच्या कान्तेचं—

**कान्ता०**—( कपाळाला आंठ्या घालून तारेकडे पहात ) हं—तारे ! मी नाहीं अं !—चूप बैस !

**रवि०**—म्हणजे ?—यांचं खरंच का लग्न ठरलेलं आहे ?

**तारा०**—ठरलंच नाहीं तर काय ? तात्यासाहेबांनीं किती तरी वेळां ही गोष्ट मावशीजवळ बोलून दाखविली आहे. आतां लवकरच साखरपुडा होऊन वाङ्निश्चयसुद्धां होईल.

**रवि०**—( स्वगत ) किती खिन्नता उत्पन्न करणारी बातमी सांगितली हिनं !—पण आपली खिन्नता कान्तेच्या ध्यानांत येऊं देतां कामा नये. प्रेम विफल झाल्याचं दुःख असह्य तर खरंच. पण विफल होण्यासारखं वेडं प्रेम आपण केलं हें दुसऱ्याला कळल्याचं दुःखच प्रेमी माणसाला अधिक असह्य होत असतं ! ( उसना उल्हास आणून तारेकडे पहात ) तुमची ही बातमी ऐकून मला किती आनंद झाला म्हणून सांगूं !

**पद** ( कल्याण–सारंग; त्रिताल )

**सुखकारिणी ही वार्ता । बहु मोद मजला देइ मना ।**
**अतिसुभग होइ घटना ती जी सुखवी सकलांसी ॥ ध्रु० ॥**
**कुलकीर्तिभाग्यें तुल्य जनांचे । सुविवाह होती शुभकारि ॥ १ ॥**

[ दासी प्रवेश करते ]

**दासी**—आईसाहेब देवदर्शनाला जायला निघत आहेत; आपण येणार ना, म्हणून विचारलं आहे.

**कान्ता०**—आईला म्हणावं आज आम्ही दोघी नाहीं येत. हें बघ, असं सांग—( रविकान्ताकडे पाहून हंसते व लगेच कांहीं विचार मनांत येऊन जागेवरून अर्धवट उठूं लागते. ) पण नको. मीच येतें अन् आईला सांगतें.

**तारा**०—नको, नको. मी जाऊन सांगतें मावशीला कीं रविकान्त आले आहेत, आम्ही बोलत बसतों म्हणून. तूं बैस. बैस कीं.

[ दासी व तारा जातात. ]

[ रविकान्त व कान्ता कांहीं वेळ स्तब्ध राहतात. कान्ता टेबलावरची एक फोटोफ्रेम नीट उभी करण्याचें निमित्त करते; व रविकान्त शेजारच्या तिपाईवरचें एक सचित्र मासिक उगीचच चाळतो. ]

**रवि**०—( स्वगत ) नानासाहेबांशीं लग्न ठरल्याबद्दल हिला खरोखरच आनंद होत असेल का ! वस्तूच्या पोटांतले पदार्थ दाखविणाऱ्या 'क्ष' किरणाप्रमाणें माणसाच्या पोटांतले विचार उघड करणारे 'ज्ञ' किरण शास्त्रज्ञांनीं कां शोधून काढले नाहींत !

**कान्ता**०—( स्वगत ) माझ्या लग्नाची बातमी ऐकून हे वरकांतीं दाखवताहेत तितका आनंद यांना खरोखरच झाला असेल का ! या शास्त्रज्ञांचे चेहरे यांच्या शोधाहूनही गूढ असतात !

**रवि**०—बोलत कां नाहीं ?

**कान्ता**०—विचार करीत होतें.

**रवि**०—कसला ?

**कान्ता**०—आज माझं अभिनंदन लोकांनीं चालवलं आहे. उलट अभिनंदन करायची संधि मला केव्हां मिळेल असा विचार करीत होतें.

**रवि**०—त्या संधीची आशा न ठेवणं बरं.

**कान्ता**०—म्हणजे ! आजन्म अविवाहित रहायचा विचार आहे कीं काय ! ( जरा थांबून ) बाकी, विद्वान व कीर्तिमान पुरुषांना रूपगुणांनीं अनुरूप वधू मिळणं कठीण असतं; अन् त्या दृष्टीनं त्यांचं मन विवाहाविषयीं विशेष उत्सुक नसलं तर त्यांत नवल नाहीं.

**रवि**०—( स्वगत ) कान्ते, दुःखावर डागण्या कां देतेस !

**कान्ता**०—मात्र विद्येनं अन् कीर्तीनं अलंकृत पुरुषांसाठीं शेंकडों तरुणी मनांत झुरत असतात. ते पुरुष जर आपली पायरी सोडून जरा खालीं येतील, तर त्या तरुणींपैकीं एकीचे तरी मनोरथ पूर्ण होऊन बिचारी धन्य होईल.



कांताः—बोल तुझे गोड असले। [ पृष्ठ १२

**रवि०**—पण अप्सरेसारखी सुंदर, सरस्वतीसारखी विद्यावती अन् इंद्रकन्येसारखी उच्च कुलांतली अशी एखादी तरुणी असेल—

**कान्ता०**—अशी तरुणी कल्पित काव्यांतच असायची. असल्या तरुणीच्या खोट्या संकेतावर कवींनीं उगीच जगाला झुलवीत ठेवलं आहे.

**पद** ( भूप; झपताल )

**भावना--लालना योजिलें कवींनीं । अज्ञशा जनां घातली विमोहिनी ॥ ध्रु० ॥ पाहिली न नयनांनीं या जगीं रमणी कोणी । चंद्रवदन, कुंदरदन, कमलनयन मोही । ऐशी सुगुणखाणी ॥ १ ॥**

मला असली तरुणी प्रत्यक्ष व्यवहारांत कधींच दिसली नाहीं.

**रवि०**—रोज दिसत असेल. दुसऱ्यांचीं अंतःकरणं खेचणारे ते सुंदर केशपाश रचण्यासाठीं आरशासमोर बसलांत कीं तिची तुमची रोज सकाळीं हंसतमुख भेट नाहीं होत ?

**पद** ( काफी; त्रिताल )

**ललना दिसे सुप्रभातीं । नयनां तुझ्या दर्पणांतीं । अलकांचिया पाशा धरितां मृदू त्या हातीं ॥ ध्रु० ॥ हंसतमुखी ती सन्मुख राही । लाजुनि वाटे पाही ॥ १ ॥**

**कान्ता०**—वा ! चांगलं काव्य झालं. मला वाटतं स्त्रियांच्या अंगीं आपल्या रूपाविषयीं अहंकार शिरतो तो पुरुषांच्या असल्या खोट्या स्तुतीमुळंच.

**रवि०**—पण ती स्तुति करायचं सौख्यही आम्हांला यापुढं दुर्मिळ होणार. तुमचं लग्न झाल्यावर तुमचं दर्शन तरी कुठलं घडायला ? श्रीमंत अन् गरीब यांचा स्नेह कमलपत्रावरच्या स्नेहबिंदूसारखा. तुमच्या स्नेहाचं सौख्य इतके दिवस घेतां आलं हेंच माझं भाग्य. गरिबाची आठवण ठेवा म्हणजे झालं. ( जरा वेळ थांबून ) हें काय ? एकदम गप्प कां झालांत ? माझ्या बोलण्यांत कांहीं चूक झाली कीं काय ?—

**कान्ता०**—( उपरोधिक स्वरानें ) चूक कशी होईल ! असामान्य शास्त्रीय शोधक म्हणून ज्यांची कीर्ति व्हायची तीं माणसं कधीं चुकीचा शब्द बोलतील का ! अन् त्यांचं बोलणं एखादे वेळीं चुकलं तरी त्यांना दोष द्यायच्या ऐवजीं आपली अपेक्षा चुकली म्हणून ऐकणारानंच आपल्या पदरीं दोष घ्यायला नको का ?

**रवि०**—हें काय म्हणताहां ?—मला कांहींच समजत नाहीं—

**कान्ता०**—न समजणं साहजिक आहे. माणसाला मोठ्या गहन शास्त्रीय गोष्टी समजायला लागल्या, कीं लहानसहान साध्या गोष्टी समजेनाशा होतात. शास्त्रीय शोधांत निमग्न राहून सदा गूढ गोष्टींचा अभ्यास करायची संवय झाली कीं माणसाला जवळच्या उघड गोष्टी दिसल्या नाहींत तर कांहीं आश्चर्य नाहीं. हा आंधळेपणा साहजिकच आहे. मला माझ्या स्वतःचा राग येतो तो येवढ्याचसाठीं कीं ही आंधळेपणाची कला मला साधली नाहीं !

**रवि०**—( स्वगत ) ही असं उपरोधिक कां बरं बोलत आहे ? माझ्या मनांतली मधुर शंका खरी असेल ? असेल तर हिचं हें उपरोधिक बोलणं गोडच वाटेल. ज्वराची बाधा झालेल्या माणसाला साखर कडू लागते; पण प्रणय-ज्वराची बाधा झालेल्या माणसाला प्रियस्त्रीचे उपरोधिक कडू बोल साखरे-हून गोड लागतात. आतां जिवाला संशयांत ठेवण्यापेक्षां उघड बोललेलं काय वाईट ! ( उघड ) कान्ते,

[ तो पुढें बोलणार इतक्यात चळवळींतील त्याचे मदतनीस विश्वास-राव घाबऱ्या घाबऱ्या प्रवेश करतात. ]

**विश्वास०**—रविकान्त, चला लवकर. किती शोधलं तुम्हांला; चला चला. भलतंच संकट आलं. जाहीर सभेला सारा घटकाभराचा अवकाश. लोकांची कोण गर्दी उसळलेली. आणि अशा वेळीं नानासाहेबांच्या सहीचा सभाबंदीचा हुकूम येऊन धडकला आहे. चला, तुम्ही ताबडतोब चला.

**रवि०**—( स्वगत ) मनांतली शंका मनांतच राहिली. कांठ ओंठाला लागला तरी पेला पोटांत जायला हजार विघ्नं असतात, त्याप्रमाणं प्रेमाचे बोल ओंठावर आले तरी बाहेर पडणं सोपं नाहीं हेंच खरं.

**विश्वास०**--रविकान्त, चला लवकर. आम्ही सगळे घाबरून गेलों आहोंत.

**रवि०**--विश्वासराव, घाबरायला काय झालं ? सभाबंदीचा हुकूम सुटला येवढंच ना. मी तर मुळीं तो हुकूम घेऊन सरळ नानासाहेबांकडेच जातों, अन् त्यांना विचारतों कीं असल्या हुकुमानं ते कोणाचं हित साधणार आहेत. अगदीं घाबरूं नका.

**विश्वास०**--आपली सभा बंद केली आहे इतकंच नाहीं, तर तुमच्यावरही वॉरंट निघणार अशी बातमी उठली आहे.

**रवि०**--मग ? त्यांत तरी घाबरण्यासारखं काय आहे ? मला पकडतील येवढंच ना ? तसं झालं तर आपली ही दारूबंदीची चळवळ थंडावण्याऐवजीं अधिक जोरावेल. शान्त रहा. येतोंच मी. ( कान्तेकडे पाहून ) जाऊं ? असं एकदम जाणं बरं दिसत नाहीं. पण जायलाच पाहिजे. रागावूं नका. (हंसून) अं ?--ताराबाईंना सांगा गेलों म्हणून. चला विश्वासराव.

[ विश्वासरावाबरोबर जातो. ]

**कान्ता०**--यांना म्हणावं सरदार ! अंगीकृत कार्यासाठीं जे आत्मसुख सोडतात तेच खरे सरदार. नाहीं तर आमचे तात्या, अन् ते नानासाहेब असले आडनांवाचे सरदार आहेतच. रविकान्त, आतां मात्र तुम्ही मला पुरती आपलीशी केलीत !

**पद** ( भीमपलास; तिताल )

**हृदयांत पूर्ण ठसली, मनें वरिली,**
**बरवी मूर्ति, प्रणयपाशिं दृढ बांधिलि साची ॥ ध्रु० ॥**
**गुणविलास नव भुलवी भारी ।**
**मनमंदिर मम नटलें आजी ।**
**रमली सेवनिं चरणीं दासी ॥ १ ॥**

[ तारा प्रवेश करते ]

**तारा०**--( इकडे तिकडे पाहून आश्चर्यानें ) हें काय ! रविकान्त कुठं गेले !

**कान्ता०**—त्यांच्या सभेवर मनाईहुकूम निघाल्याची बातमी आल्यामुळं ते तांतडीनं तिकडे गेले.

**तारा०**—खरं !

**कान्ता०**—त्यांनाही पकडणार अशी बातमी आहे म्हणे.

**तारा०**—तरी ते डगमगायचे नाहींत. रविकान्त म्हणजे कांहीं तुझे नानासाहेब नाहींत. ते नांवानं नसून दिलानं सरदार आहेत.

**कान्ता०**—तारे, तूं मला असं लावून कां बरं बोलतेस ? माझं प्रेम कोणावर आहे हें तुला माहित नाहीं का ? पण त्यांचं प्रेम माझ्यावर असेल कीं नाहीं या शंकेनं माझा जीव घाबरा होतो.

**तारा०**—तुला डोळे नसले तरी मला आहेत. रविकान्तांचं तुझ्यावरच प्रेम आहे. तूं नव्या युगांतली धीट मुलगी खरोखरच असशील तर नानासाहेबांशीं मला लग्न करायचं नाहीं असं तात्यांना सांगायला आतां भिऊं नकोस.

**कान्ता०**—पण यांत मला तुझं साहाय्य हवं.

**तारा०**—त्याबद्दल तुला शंका कशी वाटते ?

**कान्ता०**—तुझ्या या बोलण्यानं माझ्या मनाला केवढा धीर आला !

**पद** ( पहाडी मांड; केरवा )

**बोल तुझे गोड असले जीव रंजवी, सखे ॥ ध्रु० ॥**
**प्रणयी मनाची चिंता सारी ती निमाली,**
**हृदयास धीर आला, आस तोषली, खरी ॥ १ ॥**

[ आंत जाऊं लागतात. ]

( पडदा )

---

# प्रवेश २ रा

[ नानासाहेब सरदारांच्या वाड्यांतल्या बगीच्याचा एक भाग. तंबोरा गळ्यांत अडकविलेला पंचम इकडे तिकडे पहात प्रवेश करतो. ]

**पंचम**---छे ! इकडेसुद्धां ही दिसत नाहीं !--का हिला शोधतांना मीच कुठं सरगम घोकण्यांत गुंगलों अन् तेवढ्यांत ही माझ्या पुढनं निघून गेली ! ही कोकिला या सर्वाधिकाऱ्यांच्या घरच्या विठ्ठलपंत कारकुनाच्या पोटीं यायच्याऐवजीं आमच्या तात्यासाहेब सरदारांच्या एखाद्या कारकुनाच्या पोटीं कां नाहीं आली ? म्हणजे माझं प्रेमाराधन वाड्याच्या मर्यादेत साधून मला मर्यादशील म्हणवून घेतां नसतं आलं ? खरोखर, एखाद्या बादशहाच्या बेगमेवर प्रेम करणं सोपं, पण कोकिलेसारख्या मुलीवर माझ्यासारख्या एका आश्रित गवयानं प्रेम करणं महा कठीण. बादशहाची बेगम काय, प्रियकराशीं हितगुज करायला केव्हाही रिकामीच ! उलट, कोकिलेसारखी प्रिया आधीं हजार कामं वाटेला लावील तेव्हां अशा आडवाटेला आमच्या कामाच्या वांट्याला यायची ! आणि त्यांतून मला वाटतं प्रेमाचा धर्मच असा आहे कीं एखादी वस्तू काय किंवा व्यक्ति काय, ती कितीही सुलभ असली तरी तिच्यावर प्रेम करूं लागलं कीं ती दुर्मिळ झालीच म्हणून समजा. ही कोकिलाच पहा. पूर्वी दिवसांतून दहा वेळां तिच्या माझ्या गांठी भेटी होत. पण परवां लग्नाची गोष्ट तिच्याजवळ काढतांच पारध्याच्या हातून कोकिळा निसटावी तशी जी निसटली ती अजून दृष्टीस पडली नाहीं. आतां हिला शोधायची तरी कुठं ? ( विचार करून ) हां, हां. असंच करावं. पूर्वी कृष्णाला आपल्या भोंवतीं गोपी गोळा कराव्याशा वाटल्या कीं तो आपली मुरली वाजवी, त्याप्रमाणं कोकिला आकर्षून आणण्यासाठीं पंचम स्वर काढावा. तिचं माझ्या गाण्यावर प्रेम आहे. जवळपास असली तर माझं गाणं ऐकतांच इकडे येईल.

### पद

**अजि गोकुळीं मनरंग कान्हा । यमुनातीरीं करि गायना ॥ ध्रु० ॥**
**शिणला हरी करिं वेणु धरुनी । प्रिय गोपिकांची वाट बघुनिया ॥१॥**

[ पद संपल्यावर इकडे तिकडे पाहतो पण कोणीच दिसत नाहीं. ] काय ! कोकिलेला आकर्षून घ्यायला माझा पंचम स्वर असमर्थ ठरला ! अरे अरे अरे ! काय ही संगीताची अवनति ! पूर्वी कृष्णाच्या टीचभर मुरलीला भुलून रासभर गोपी गोळा होत असत, अन् आज हा लांबलचक तंबोरा घेऊन मीं इतका कंठशोष केला तरी माझ्या एकुलत्या एक गोपीची चाहूलसुद्धां माझ्या कानावर येऊं नये ! शिव शिव ! स्वर्गातून पाहणाऱ्या सदारंग अदारंगांच्या आत्म्यांनो, तुम्हांला काय यातना होत असतील माझी ही विटंबना पाहून ! ( उसासा टाकतो व डोळे मिटून एक सरगम घोकूं लागतो. )

[ पडद्यांत एका बाजूनें " कोकिले ! अग कोकिले ! " अशा हांका ऐकूं येतात व दुसऱ्या बाजूनें " आलें आलें " असें कोकिलेचें उत्तर ऐकूं येतें. ]

**पंचम**०—( दचकून ) अरेच्या ! ( कोकिलेच्या बाजूस पाहून ) हें कोण ! ओ ऽ हो ! हा तर माझ्या जिवाच्या रागांतला वादी स्वर !

[ फुलांनीं भरलेली परडी घेऊन कोकिला प्रवेश करते व पंचमाकडे लक्ष न देतां जाऊं लागते. पंचम पुढें होऊन तिचा हात धरावयास जातो, तों त्याच्या धक्क्यानें परडी कलंडून सारीं फुलें सांडतात.]

**कोकिला**०—बाई, बाई, बाई, किती बेताल हो तुम्ही !

**पंचम**०—कोकिले, जमिनीवर पडतांना या नाजूक फुलांना झाल्या नसतील इतक्या वेदना तुझ्या बेताल या एका शब्दानं मला झाल्या. तुला एकदांच सांगून ठेवतों कीं स्त्रियांना आपल्या वाढत्या वयाचा उल्लेख जसा सहन होत नाहीं तसाच आम्हां गवयांना बेताल हा शब्द कधीं सहन व्हायचा नाहीं. माझ्या वडिलांना तालाचं डोकं मुळींच नव्हतं. ते जन्मभर बेताल वागले अन् बेताल गायले. पण कुणी त्यांना बेताल म्हटलं कीं वेताळरूप धारण करून त्याचा पुरा समाचार घेतल्याशिवाय ते रहात

नसत. ते वारले तेव्हां एक तंबोरा अन् तंबाखूचा बटवा याखेरीज मला द्यायला दुसरी कसलीच इस्टेट त्यांच्याजवळ नव्हती. पण दसलाखाच्या इस्टेटीपेक्षां मोलाचा म्हणून जो अखेरचा उपदेश त्यांनीं मला केला तो हाच, कीं बेटा, वाटेल तें सहन कर पण बेताल हा अपशब्द सहन करूं नकोस. कोकिले, तूं आपला शब्द परत घे, नाहीं तर—

**कोकिला०**—हीं फुलं वेंचून परडींत परत टाकीत असाल तर मी आपला शब्द परत घेतें. पण उघड्या वाटेवर माझा असा हात धरण्यांत तुमची व्यवहारशून्यता नाहीं का दिसली ?

**पंचम०**—( खालीं बसून फुलें गोळा करीत ) हां, मला तूं व्यवहार-शून्य खुशाल म्हण. कोणी व्यवहारशून्य म्हटल्याचं आम्हा गवयांना मुळींच दुःख वाटत नाहीं. आमचे बाबा नेहमीं म्हणत कीं गवयाच्या अंगीं व्यवहार व विद्या हीं व्यस्त प्रमाणांत असलेलींच शोभतात. होतकरू गव-यांनीं गिरवायसारखा बाळबोध कित्ता म्हणून आमचे बाबा ज्या खांसाहे-बांचा दाखला नेहमीं देत असत त्यांनीं तर व्यवहारशून्यतेचा कळस गांठला होता. आपल्याला मुलं किती आहेत हें शेवटपर्यंत त्यांना कधीं बिनचूक सांगतां आलं नाहीं; अन् सही केली कीं गवयाचं आयुष्य कमी होतं अशी त्यांची समजूत असल्यामुळं मरेपर्यंत त्यांनीं कधीं सही केली नाहीं. खायला अफू, प्यायला शराब, अन् शरीर दिसायला वस्त्रहीन पण अनेक अंगवस्त्रांनीं अलंकृत झालेलं अशा अवधूत स्थितींत त्या खांसाहे-बांनीं आयुष्य काढलं म्हणे. आणखी—–

**कोकिला०**—पुरे बाई, तुमच्या या खांसाहेबांच्या गप्पा सुरू झाल्या कीं कधीं संपायच्या नाहींत. हीं फुलं मला लवकर नेऊन दिलीं पाहिजेत. अगबाई, किती उशीर झाला मला ! जातें मी !

**पंचम०**—कोकिले, तुला हें शोभतं ना ?

**कोकिला०**—काय, शोभायचं काय ?

**पंचम०**—हें असं जाणं.

**कोकिला०**—असं जाणं ?—–म्हणजे ?—–मी आपली सरळ रस्त्यानं जातें आहें, त्यांत काय चुकलं ?

**पंचम०**—अग, तुझ्यासारख्या तरण्याताठ्या मुली जर यमनकल्याणी सरळ रस्त्यानं जाऊं लागल्या तर व्हायचं कसं ? तुझ्या वयांत कामरागाचे वाकडे तिकडे चढउतारच सुचायला पाहिजेत.—कोकिले, परवांच्या माझ्या प्रश्नाचं उत्तर तूं केव्हां देणार ? उगीच किती माझा अंत पाहतेस ? माझ्या हृदयांतलं प्रेम तुला अजून कसं पटत नाहीं ? तुला शंका असली तर माझ्या छातीशीं कानोसा घे, म्हणजे मलकाजानच्या प्लेटमध्यें ठेक्याचे बोल ऐकूं यावे तसे प्रेमाचे बोल तुला स्पष्ट ऐकूं येतील.

**कोकिला०**—ते ऐकण्यांत वेळ घालवला कीं कामाचा खोळंबा होऊन शिव्या मात्र ऐकून घ्याव्या लागतील खऱ्या. अन् तुम्हीं माझा खोळंबा केलात हें जर वाड्यांत कळलं तर तुमचीसुद्धां वरात निघाल्याशिवाय राह्यची नाहीं.

**पंचम०**—वा ! तेंच तर मला पाहिजे आहे. म्हणूनच म्हणतों कीं तूं एकदां हो म्हण कीं तात्यासाहेबांना विनंति करून आपल्या वरातीचा असा थाट उडवून देऊं कीं—

**कोकिला०**—काय तुमचं बोलणं हें ? आमच्या बाबांनीं जर तुमचं हें बोलणं ऐकलं तर तें बोलल्याबद्दल तुमची जीभ अन् ऐकल्याबद्दल माझे कान छाटून टाकायला ते कमी करायचे नाहींत. आमचे बाबा यजमानांचे सरकारकून आहेत. कारकुनाच्या कुळावांचून ते सोयरीक जोडायचे नाहींत !

**पंचम०**—वेडेच आहेत विठ्ठलपंत ! गवयाला मुलगी दिल्यानं कारकुनाच्या कुळाला कमीपणा येईल कां मोठेपणा येईल ? कारकुनापेक्षां गवयाचा दर्जा किती तरी मोठा. कारकुनाची बोरूची लेखणी किती झाली तरी टीचभर. आमच्या चार हात लांबीच्या रुबाबदार तंबोऱ्याची तिनं काय बरोबरी करावी ? कारकुनाच्या कळकट कानशिलावरची काळतोंडी लेखणी श्रेष्ठ, कीं चार तारा, चार खुंट्या अन् अपार नादसमुद्रांतून तारून नेणारा हा भोपळा अशा ऐश्वर्याची आमची ही वीणा श्रेष्ठ ? आमची वीणा प्रत्यक्ष सरस्वतीच्या हस्तस्पर्शानं पुनीत झालेली आहे. कारकुनाची लेखणी एखाद्या देवतेनं हातीं धरल्याचा कुठं दाखला आहे का ? आतां सांग, तुझं लग्न माझ्याशीं लागलं तर तुझ्या बाबांचा कारकुनी दर्जा कमी होईल का वाढेल ?




**पंचमः**—आतां सांग तुझं लग्न माझ्याशीं लागलं तर तुझ्या बाबांचा दर्जा कमी होईल का वाढेल ? [ पृष्ठ १६

**कोकिला०**--तुमचं म्हणणं अगदींच वावगं नाहीं. पण तें बाबांना पटलं पाहिजे ना.

**पंचम०**--अग, आईबापांच्या इच्छेप्रमाणं लग्न लावायचं युग संपलं आतां. उद्यां बघ आमच्या कान्ताताईसुद्धां म्हणतील, कीं मला नाहीं नाना-साहेबांशीं लग्न करायचं. अन् हें बघ तुला तुझ्या हिताची गोष्ट म्हणून सांगतों, कीं सोईच्या दृष्टीनं गवई नवरा सगळ्यांत चांगला. त्याच्या खाण्यापिण्याची तरतूद फारशी करायला नको. दिवसाकाठीं शेंपन्नास विड्याचीं पानं अन् छटाक तंबाखू त्याला पुरविली कीं त्याचं तोंड बंद. गवयाच्या बायकोइतकं स्वातंत्र्य कुणालाच मिळायचं नाहीं. कारण तो एकदां तंबोरा काढून मेहनतीला बसला, कीं चार घटकांची निश्चिंती समजून बायकोनं खुशाल फेरफटका करून यावं. अन् प्रेमाबद्दल म्हणशील तर प्रेमाचा सांठा गवयाइतका कोणाच्याच जवळ नसतो. कारण, त्याच्या पाठान्तरांतल्या चिजांत प्रेम हा शब्द हटकून घोळत असल्यामुळं प्रेम ही चीज त्याच्या पोटांत भरपूर वाढलेली असते.

**कोकिला०**—तुमचं म्हणणं मला बरंचसं पटतं; अन् नाटकांतल्या मुलीप्रमाणं लग्नाच्या बाबतींत बाबांची मर्जी मोडायलाही मी तयार होईन. पण तसं करायचं झालं तर मला येवढं तरी समाधान पाहिजे, कीं पति निवडला तो पराक्रमी निवडला असं लोकांनीं म्हणावं.

**पद** ( सारंग; त्रिताल )

**हा धन्यसा गमला मज जीव जगामधिं। हा धन्य ॥ध्रु०॥**
**पति निवडीला। जरि स्वमतानें । धीट पराक्रमी। हा धन्य ॥ १ ॥**

म्हणून म्हणतें, तुम्ही पराक्रमी व्हा.

**पंचम०**—मग !--माझी कुठं ना आहे पराक्रमी व्हायला ! कोणता पराक्रम करून दाखवूं ! ऐन मध्यान्हीचा सारंग ऐन मध्यरात्रीं गाऊन त्या रागाच्या देवतांच्या क्रोधाशीं क्रीडा करून दाखवूं ! ( तंबोऱ्याच्या खुंट्या

पिळण्यास प्रारंभ करून ) कां मियाचा मल्हार बेफाम बेसुरानं छेडून जेजुरीच्या मल्हारी मियाला धांव घ्यायला लावूं ?--कां भीमपलासींतल्या चार नरडीच्या ताना घेऊन प्रत्यक्ष भीमाची नरडी दाबल्याचा भास उत्पन्न करूं ?--कां—

[ पडद्यांत " कोकिले ! अग कोकिले ! काय बाई तरी तुझं जाणं हें ?" ]

**कोकिला०**—अगबाई ! ( बाजूस ) आलें, आलें ! (पंचमास) काय वाटेल तें करा, वाटेल तो पराक्रम करा, वाटेल तें साहस करा. पण साहसाखेरीज माझी प्राप्ति व्हायची नाहीं हें लक्षांत ठेवा. (पडद्यांत पुन्हां हांका.) आलें, आलें ऽऽ ! [ जाते. ]

**पंचम०**—( उसासा टाकून ) हं ऽ ! शेवटीं नाटककादंबऱ्यांतल्या नायकाप्रमाणं या गायकावर साहस करायची वेळ आली म्हणायची ! हें जमायचं कसं ? आम्हां गवयांच्या अंगीं शौर्याच्या नांवानं आमच्या तंबोऱ्याच्या भोपळ्यायेवढं पूज्य असायचं. बेसुऱ्या ताना मारतांना होणारे सात सुरांचे खून हेच काय ते आमचे लढाऊ पराक्रम ! असल्या पराक्रमांनीं ही कोकिला कोठली संतुष्ट व्हायला ?--हं ऽ ! काम कठीण आहे. पण कामातुर माणसानं कठीण कामाला तयार असलंच पाहिजे. कांहीं झालं तरी कोकिला हातची घालवितां कामा नये.

[ मनाशीं सरगम घोकीत जातो. ]

---

## प्रवेश ३ रा

[ तात्यासाहेबांच्या वाड्यांतील दिवाणखाना. तात्यासाहेब व नानासाहेब मध्यभागीं एका कोचावर बसले आहेत. बाजूला जरा अंतरावर विठ्ठलपंत व हरभट बसले आहेत. सर्वांच्यापुढें मदिरापात्रें आहेत. मैना नायकीण गात आहे. चीज पुरी झाल्यावर ती उठते व सर्वांचीं मदिरापात्रें भरूं लागते. ]

**हरभट०**—( मैना विठ्ठलपंताचा प्याला भरत आहे असें पाहून )

मैने, मी म्हणतों विठ्ठलपंतापुढचं तें कंचपात्र जेहेत्ते उचलून त्याच्यापुढं सोमरसाची सबंध शिशीच जेहेत्ते ठेव !

**नाना०**--वा, तात्यासाहेब, तुमचा हरभट आज चांगलाच रंगला आहे.

**विठ्ठल०**—आत्तांपर्यंत किती खलास केली त्यानं विचारा.

**हर०**—आज मुळीं यजमानांची ताकीदच आहे, कीं भावी जामातांसाठीं आजची ही खास बैठक आहे; आज यजमानांना पोटांत मावेनासा आनंद झाला असल्यामुळं प्रत्येकानं पोटांत मावेनासा होईपर्यंत सोमरस घेतला पाहिजे. आज आमच्या हातून जितक्या शिशा अधिक फुटतील, तितक्या यजमानांच्या आनंदाला अधिक उकळ्या फुटतील. मैने, आण दोन शिशा. एक त्या विठ्ठलपंतापुढं ठेव. अस्सं. अन् एक या हरशास्त्र्यापुढं ठेव. अस्सं. हरिहराचं वांकडं आहे असं कोण दीडशहाणा म्हणत असेल त्याला आणा आतां खेंचून.

**विठ्ठल०**—बाकी साहेब, एकदोनच काय, डझनावारी बाटल्या खालीं करण्याइतकी तपश्चर्या या हरभटानं—

**हरभट्ट०**—सबूर, सबूर ! प्रथम माझी एक तक्रार यजमानांनीं ऐकावी. ( नानासाहेबांकडे बोट करून ) साहेबांनी किंवा यजमानांनीं मला हरभट म्हटलं तर एक वेळ चालेल. पण दुसऱ्या कोणी हरभट म्हटलेलं मला बिलकुल सहन व्हायचं नाहीं. शास्त्री या उपाधीसकटच माझ्या नांवाचा निर्देश झाला पाहिजे. कारण, शास्त्रानं निषिद्ध मानलेली एकही गोष्ट या हरशास्त्र्याच्या हातून कालत्रयीं घडणार नाहीं. ( दोन वेळां ग्लासांतून घुटके घेतो व ढेंकर देतो. ) स्मृतिविहित काल संपला तरी माझी लेक लग्नाची राहिली आहे हें खरं, पण तो कांहीं माझा दोष नव्हे. बरं, मी खातों, पितों म्हणून लोकांना वाटत असेल कीं, मी धर्मविरुद्ध आचरण करणारा आहें. पण ( उभें राहून आवेशानें ) यजमानसाहेब, या दोन्ही गोष्टी आमच्या वेदांत सांगितलेल्या आहेत. " भक्षणं पेयपानं वा नरप्रकृतिरेव च ।" असं स्पष्ट वचन आहे. वेदांच्या आधारावांचून नांहीं बोलायचे आम्ही ! अन् या बैठकींत मैना इथं आहे हेंही युक्तच

आहे. " सोमपाने स्त्रियः साहचर्यम्। " असं अगदीं ठणठणीत वचन आहे. वेदांच्या आधारावांचून पाऊल नाहीं पडायचं आपलं !

**विठ्ठल०**—आतां तुमचं पाऊल पुढं पडायला माणसाचाच आधार पाहिजे. बिचाऱ्या वेदांचा आधार काय पुरणार !

**तात्या०**—आज हें वेदोक्त विमान खूपच वर चढलं आहे. मैने, हरभटापुढं एक सोडून दोन बाटल्या ठेव, त्याशिवाय जमिनीचा आधार पुरता सुटून त्याची वेदांच्या आधाराची बडबड बंद नाहीं पडायची. अस्सं. ( नानासाहेबांकडे वळून त्यांच्या ग्लासांत ओतण्यासाठीं बाटली आडवी करून ) साहेब, आपल्या ग्लासांत—अं—?

**नाना०**—नको तात्यासाहेब; या वेळीं मी मजेंत आहें, जास्त नको.

**तात्या०**—एक थेंब ! साहेब, माझी मुलगी आपणांला अर्पण करावी ही माझी मनीषा आपण पूर्ण केलीत, याबद्दल मला जो आनंद होत आहे तो अंशतः प्रदर्शित करण्यासाठीं आजचं हें सारं आहे. या वेळीं अगदीं उल्हसित वृत्तींत आपणांला पाह्यची इच्छा आहे. आपण आणखी एक थेंब तरी घ्यायला पाहिजे.

**नाना०**—एक थेंबच. हं—पुरे.

**तात्या०**—मला फार बरं वाटलं. हं, मैने आतां होऊं दे नाचाला सुरवात.

[ मैना टेबलावरचीं घुंगरें उचलून घेते व मधोमध गालिच्यावर बसून नेसणें वर करून एकेका पायावर घुंगरें बांधूं लागते. हरभट तिच्या पायांकडे टक लावून पहातो. ]

**नाना०**—काय विठ्ठलपंत, हरभट काय पाहताहेत !

**विठ्ठल०**—दुसरं काय ? अशा गोजिरवाण्या लाथा खायला वेदांचा आधार सांपडतो का पाहताहेत. (सर्व हंसतात. )

**तात्या०**—मैने, घुंगरं बांधून झालीं, साथ संगतवाले तयार आहेत. आतां बसलीस कां ?

**मैना०**—( नानासाहेबांकडे पाहून व परस्परांत आधीं कांहीं तरी

ठरलें असल्यासारखा नेत्रसंकेत करून ) मी आपल्याजवळ एक लहानशी देणगी मागणार आहें. ती मिळाल्याबरोबर मीं मुजरा केलाच म्हणून समजा.

**तात्या०**—हात्तिच्या. मग इतका वेळ स्वस्थ कां बसलीस ! माग, काय हवं तें माग. अशा आनंदोत्सवाच्या वेळीं, अन् विशेषतः भावी जामातांच्या उल्हासाचा प्रश्न असतांना मी पैशाची कदर बाळगीन !

**नाना०**—( स्वगत ) कशाला बाळगशील ! माझ्याकडे सबंद इस्टेट गहाण टाकून पैसा हातीं खेळवायला मिळाल्यावर पैशाची कदर तुला कशाला वाटेल ! त्यांतली अर्धी इस्टेट सोडून द्यायचं मी कबूल केलं आहे खरं. पण तिच्या बदला याची अप्सरेसारखी सुंदर मुलगी मला मिळणार. मी डाव हुशारीनंच टाकलेला आहे.

**तात्या०**—मैने, उशीर करूं नकोस. माग.

**मैना०**—नाहीं म्हणतां कामा नये अं.

**तात्या०**—माग.

**मैना०**—साऱ्या पेठेंत ज्याचं मोती बिनमोल ठरलं आहे तो तुमच्या बायकोच्या गळ्यांतला कंठा पाहिजे मला.

**तात्या०**--( स्वगत ) अगदीं भलतीच वस्तू हिनं मागितली. बायकोच्या अंगावरचा एखादा दागिना काढून देणं मला कठीण आहे असं नाहीं, पण हा कंठा तिच्या माहेरचा—तिच्या आईकडून तिला मिळालेला आहे. तो तिच्याजवळ मागणं—बाकी, ती माझा शब्द खालीं पडूं द्यायची नाहीं.

**मैना०**--तात्यासाहेब, देतां ना ?

**तात्या०**—हो. तुझा नाच संपतांच तो तुझ्या गळ्यांत पडेल.

**मैना०**—हें नाहीं चालायचं. आधीं कंठा माझ्या गळ्यांत पडल्याखेरीज मी नाहीं मुजऱ्याला उभी राह्यची.

**तात्या०**--हंः ! तूं कोणाचं सत्त्व पहात आहेस तुला माहीत नाहीं भावी जामातांच्या खुषीसाठीं टाकलेला शब्द वाया जाऊं नये म्हणून कंठा चसा काय, बायकोचा कंठ चिरून मागितला असतास तरी दिला असता

बायकोला इकडे बोलावून तिच्या हातूनच तुला कंठा देववितों. हरभट, जा, तिला म्हणावं मी जरा इकडे बोलावलं आहे. ऊठ ना. थांबलास कां?

**हर०**––जातों ना. पण मला थोडं भय वाटतं. वहिनीसाहेबांच्या तिथं जर कां ताईसाहेब अन् ताराबाई असल्या तर माझा धीर खचल्यावांचून राह्यचा नाहीं.

**तात्या०**––मूर्खच आहेस. त्या दोघी पोरी तुला खातात कीं काय? हं, ऊठ.

**हर०**––( जातां जातां ) नाहीं, जातों मी. पण त्या रविकान्ताचं अन ताईसाहेबांचं एकमेकाकडे जाणं येणं वाढल्यापासून आपल्याला जरा त्यांच्या पुढं हें होतं बुवा. [ जातो. ]

**नाना०**––( एकदम उसळून ) काय? रविकान्ताच्या घरीं तुमची लेक जाते येते? अन् तो उर्मट दरिद्रीही इथं येतो जातो? तात्यासाहेब, हे असले प्रकार तुमच्या डोळ्यांदेखत चालतात?

**तात्या०**––साहेब, आपण––

**नाना०**––छे! कांहीं सांगूं नका. रविकान्ताला आम्ही कोणत्या रीतीनं वागवूं इच्छितों तुम्हांला माहीत नाहीं? त्याच्या जाहीरसभेवरचा बंदीचा हुकूम दोन घटकांपूर्वीं मीं आपल्या हातानं लिहिलेला तुम्हीं पाहिला नाहीं? असं असतां, जी तुमची मुलगी उद्यां माझी अर्धांगी व्हायची तिचं अन् रविकान्ताचं एकमेकाकडे जाणं येणं असावं! अन् तें तुम्ही खुशाल वाढूं द्यावं! मला हें बिलकुल सहन व्हायचं नाहीं. शक्य असतं तर या बाबतींत ताकीद करण्यासाठीं रविकान्ताला आत्तांच्या आत्तां बोलवून आणून––

[ रविकान्त प्रवेश करतो. ]

**रवि०**––ती तसदी आपल्याला न देतां मी आपल्यापुढं उभा आहें. आपल्या घरीं गेलों, अन् इथं आहांत असं कळलं म्हणून तांतडीनं इथं आलों. मात्र मी आलों आहें तो आपल्याकडून ताकीद ऐकण्यासाठीं नव्हे तर ( हातांतील कागद दाखवीत ) या आपल्या सभाबंदीच्या विचित्र हुकमाचा अर्थ विचारण्यासाठीं आलों आहें.

**तात्या०**––आधीं मुळीं आमच्या या खाजगी बैठकींत पाऊल टाक-

ण्याचा तुम्हांला काय हक्क आहे सांगा. आलांत तसे मुकाट्यानं जाल तर बरं.

**रवि०**——नानासाहेब इतक्या खाजगी अवस्थेंत माझ्या दृष्टीस पडतील ही मला कल्पना असती तर कदाचित् मी आलोंही नसतों. अन् माझा हक्क कसला विचारतां? जुलमी हुकमांनीं प्रजेला घायाळ करून मग प्रजेचं विव्हळणं कानीं येऊं नये म्हणून खाजगी महालांत दडण्याचा अधिकाऱ्यांनाच हक्क काय आहे सांगा. आमची शान्ततेची सभा बंद करण्याच्या या विक्षिप्त हुकमाचा अर्थच मला कळत नाहीं. नानासाहेबांनीं मला उत्तर दिलंच पाहिजे.

**नाना०**——अर्थ कळत नसेल तर एक शब्दकोश घेऊन बसा त्याच्या-वर डोकं घाशीत! हंः! [ ते व तात्यासाहेब हंसतात. ]

**विठ्ठल०**——( उठून रविकान्ताजवळ जाऊन) अहो रविकान्त, कसली बसलां आहांत अर्थाची हुज्जत घालीत? इकडे या. असे बसा. ही अप्सरा तुम्हांला एक चषक देईल त्याचं सेवन करा, म्हणजे तुमचे तुम्हांलाच तऱ्हेतऱ्हेचे अर्थ सुचूं लागतील. हा राजमार्ग सोडून कसल्या भरवतां आहां सभा? अहो, तुम्ही दारूबंदीची चळवळ करताहां ना?——मग आम्ही तरी दुसरं काय करीत आहोंत? अहो, जितकी दारू आम्ही पिऊं तितकी नाहींशी, म्हणजे बंदच होणार कीं नाहीं? ( हंसतो. ) अहो तुमचं आमचं ध्येय एकच! मार्ग निराळे येवढंच काय तें! अहो या, या असे.

( सगळी मंडळी हंसतात. )

**रवि०**——मूर्खा, दूर हो. नानासाहेब, माझ्या प्रश्नाचं मला उत्तर पाहिजे. स्नेहभावानं सांगतों म्हणा, किंवा आपण अधिकारी व मी प्रजा या नात्यानं विनवतों म्हणा, या असल्या जुलमी हुकमानं प्रजेला छेडूं नका. दिलदारपणानं हुकूम परत घ्या. नाहीं तर——

**नाना०**——नाहीं तर काय?——मला भय दाखवून हुकूम रद्द करून घ्यायच्या खुळचट हिशोबानं तुम्ही इथं आलां आहांत एकूण! चालते व्हा.

**रवि०**——नानासाहेब, पुन्हां सांगतों असा अविचार करूं नका. सहन-

शीलतेची झोंप टाकून प्रजा एकदां उठली म्हणजे सहस्र नागांच्या बळानं उठते हें ध्यानांत ठेवा.

**नाना०**—हः हः ! चालते व्हा म्हटलं ना. काय करायचं असेल तें खुशाल करा.

**रवि०**—ठीक आहे. मग आत्तांच बजावतों, कीं जी सभा आज तुम्हीं बंद केलीत ती आजपासून सातव्या दिवशीं, पुढच्या सोमवारीं, त्याच जागीं दसपट मोठ्या प्रमाणावर आम्ही भरवतों. हीं असलीं कामं बाजूला ठेवून आपण सभेला जरूर या. नमस्कार. आणखी हेंही सांगतों कीं—— [ हरभट प्रवेश करतो. ]

**तात्या०**—काय रे ?

**हर०**—वहिनीसाहेब म्हणाल्या, मी बाहेर येत नाहीं, आपणच आंत येऊन काय काम असेल तें सांगावं.

**तात्या०**—( संतापून ) काय ! येत नाहीं म्हणते ?—मग यायला लावीनच तर ! जा, तिला म्हणावं—

**हर०**—आपण नाहीं पुन्हां जाणार. ताईसाहेब अन् ताराबाई तिथं आहेत. त्यांनीं आत्तांच माझी यथास्थित संभावना केली. पुन्हां गेलों कीं माझं वेदशास्त्रसंपन्न उत्तमांगच भंग पावेल. विठ्ठलपंताला धाडा यजमान.

**तात्या०**—ठीक आहे, विठ्ठलपंत तूं जा. तिला म्हणावं ताबडतोब इकडे आलं पाहिजे.—अन् हें बघ, कान्ता, तारा यांनाही म्हणावं मीं बोलावलं आहे. त्यांचंही बंड आत्तांच मोडतों. [ विठ्ठलपंत जातो. ]

**हर०**—सगळ्यांना सांगा बाहेर यायला. या म्हणावं इकडे. या बाबतींत गोऱ्या लोकांच्या बायका फार चांगल्या ! सैंपाकघरांत लपून नाहीं बसायच्या. साहेबांच्या जोडीनं हात मारतील. आणि आमच्याकडेसुद्धां वेदकालांत गार्गी, मैत्रेयी वगैरे स्त्रिया सोमरसाचे कुंभच्या कुंभ ऋषींच्या बरोबरीनं उठवीत होत्या. वेदांच्या आधारावांचून नाहीं बोलायचे आम्ही ! बोलवा साऱ्या बायकांना बाहेर.

**रवि०**—( स्वगत ) हा आहे तरी काय प्रकार ! असल्या पागल व्यस-

नाच्या वेळीं घरांतल्या स्त्रियांना जुलमानं समोर आणण्यापर्यंत या लोकांची अधोगति पोंचली !

[ विठ्ठलपंत व त्याच्यामागून वहिनीसाहेब, कान्ता व तारा प्रवेश करतात. रविकान्ताला पाहून कान्ता व तारा यांना आश्चर्य वाटतें. तारा त्याच्याजवळ जाते. तो व ती एकमेकांच्या कानांत कांहीं बोलतात व दोघांचेही चेहरे जरा गंभीर होतात. मग ती, कान्ता आपल्या आईजवळ उभी राहिलेली असते तिच्याजवळ जाते. ]

**तारा०**—( कान्तेस ) वा ! किती उदात्त अन् सोज्वल देखावा पण हा ! कान्ते, घरांतलं हें सौभाग्य पाह्यची संधि घरांतल्या बायकामुलींना एकवार मिळावी या उदार बुद्धीनं तात्यांनीं आपल्याला इथं बोलावलं मला वाटतं.

**कान्ता०**—( तारेस ) तारे, आम्हां सरदारांच्या अधोगतीचं याहून अधिक किळसवाणं दृश्य कोणतं असेल ! हें पाहून मला तर मूर्च्छा येत आहे.

**वहिनी०**—कशाला बोलावलं होतं !

**तात्या०**—आपल्या भावी जामातांच्या आनंदासाठीं तूं काय करायला तयार होशील !

**वहिनी०**—हा काय प्रश्न ! आपली आज्ञा झाल्यावर मी काय करणार नाहीं ?

**तारा०**—( कान्तेस ) तुझ्या तात्यांनीं तर चारचौघांत नानासाहेबांना जांवईबापू म्हणायला सुरवात केली !

**कान्ता०**—( तारेस ) तुझ्या बुद्धीला यांत विनोदाचा विषय दिसतो, पण मला हें सारं असह्य झालं आहे.

**तात्या०**—कान्ते, ऐकलंस तुझ्या आईचं बोलणं ! मुलगी आणि जांवई यांच्या सुखापुढं आम्ही आईबाप स्वर्गसुखाचीही पर्वा करीत नाहीं. तुझ्या आईच्या तुझ्यावरच्या प्रेमाची मला खात्री आहे म्हणूनच मीं तिला अन् तुला आत्तां इकडे बोलावलं. तिच्याजवळ मी एक वस्तू मागणार आहे. ( वहिनीसाहेबांकडे पाहून ) देशील ना !

**वहिनी०**—आज्ञा करावी अन् मग पाहावी माझी परीक्षा.

**तात्या०**—आजच्या या गमतीच्या समारंभांत जामातांच्या आनंदांत कांहीं कमतरता राहूं नये म्हणून मैनेला बोलावलं होतं, पण ती अजून अल्लड अन् लहरी आहे. तुझ्या गळ्यांतल्या कंठ्याची ख्याति तिनं ऐकलेली दिसते. तो मिळाल्याखेरीज नाचाला उभं राह्यचं नाहीं असा हट्ट धरून ती पाहा कशी बसली आहे. काढ तो कंठा अन् घाल तिच्या गळ्यांत.

**रवि०**—तात्यासाहेब, हें तुम्हीं मांडलं आहे काय?—तुम्ही शुद्धीवर आहांत का असं विचारावं तर बोलून चालून तुम्ही गैरशुद्धीच्या गलिच्छ पाणथळींत उतरलां आहांत. पण बेहोषपणांतही कांहीं सीमा ठेवा. आपल्या साध्वी स्त्रीची ही विटंबना—

**तात्या०**—चोंबड्या, भिकारड्या, चूप! तूं आधीं इथं उभा कां राहिला आहेस बोल. तुझं काम मघाशींच संपलं. चालता हो. आमच्या घरांत चोरासारखं शिरून आमच्या कामांत व्यत्यय करण्याचा तुला काय हक्क आहे?

**रवि०**—हक्क! सत्य आणि शील यांच्या रक्षणासाठीं धांव ठोकण्याचा प्रत्येक मनुष्याला जन्मसिद्ध हक्क असतो.

**पद** ( देस; एकताला )

**बांधवांच्या सदनीं पापपावकातें ।**
**बघुनि सुजनहृदय धांव घेतें ॥ ध्रु० ॥**
**रक्षुनिया शीलातें । सुमति जलनिपातें ।**
**धन्य होतें ॥ १ ॥**

तात्यासाहेब, सुविचार करा आणि हा प्रकार थांबवा.

**तात्या०**—बस कर तुझी आगंतुक वटवट. अधिक बोलशील तर तुला धक्के मारून घालवून देईन. ( पत्नीकडे वळून ) दे तो कंठा इकडे. मी घालतों मैनेच्या गळ्यांत.

**वहिनी०**—( स्वगत ) इतकं भलतं मागणं होईलसं वाटलं नव्हतं. माझ्या आईनं जसा हा कंठा मला दिला तसा माझ्या हातांनीं तो ताईच्या गळ्यांत पडावा असा माझा हेतू होता. देवा, ही काय बुद्धि दिलीस इकडे!

**तात्या०**—पहा, तूं विचारांत पडलीस. तुम्हां बायकांना दागिन्यांचा मोह आवरणं कठीण हेंच खरं.

**कान्ता०**—तात्या, इतका वेळ मी गप्प राहिलें, पण आतां राहवत नाहीं म्हणून बोलतें. कुठली मातीमोलाची मैना नायकीण, अन् तिची लहर पुरवायसाठीं आईच्या गळ्यांतला कंठा तुम्ही मागतां ? माझ्या या साध्वी मातेच्या हृदयाच्या सहवासानं पवित्र झालेला कंठा एका बाजार-बसवीसाठीं भ्रष्ट करतांना तुमचं मन कचरत कसं नाहीं ? तात्या, मी साफ—

**वहिनी०**—ताई, तूं उगीच--

**कान्ता०**—आई, इतके दिवस या साऱ्या गोष्टी डोळ्यावर कातडं ओढून मी पहात आलें. इतर सरदारघराण्यांप्रमाणंच आपलंही घराणं अधःपाताच्या पटावरचं एकेक घर खालीं सरकतांना पाहून माझं मन आंतून सारखं जळत असे. पण मनाची आग मी आंतल्या आंत शमवीत आलें. कान्ता शिकली सवरली अन् उर्मट झाली, असं कोणी म्हणूं नये असं मला वाटे. पण आजचा हा प्रकार पाहून माझी पुरी खात्री झाली, कीं आम्ही सरदारांच्या मुलींनीं वेळींच धिटाई केल्याशिवाय हें जुनं, व्यस-नाचं अन् खोट्या मोठेपणाचं युग बदलायचं नाहीं ! म्हणून मी बोलतें आहें आई !

**तारा०**--( स्वगत ) शाबास, कान्ते, शाबास ! जुन्या युगाचे कोट-किल्ले जमीनदोस्त करण्यासाठीं पहिली तोफ तर तूं चांगली डागलीस ! या गर्जनेनं कडेकोटांतले सारे पथ्थर हादरूनच गेले असतील !

**हर०**--शान्तं पापम्. शान्तं पापम्. ताईसाहेब, काय हा भ्रष्टाकार ! पितरांचा अवमान करण्यासारखं दुसरं पाप नाहीं. "आचार्यश्च पिताचैव माता ।" असं खडखडीत वचन आहे. वेदांच्या आधारावांचून नाहीं बोलायचे आम्ही !

**कान्ता०**--आणि आई, तुला माझी विनवणी आहे कीं जुन्या युगाच्या गुलामी प्रदेशांत आतां उगीच रेंगाळूं नकोस. जरा नव्या युगांत पाऊल टाक. तात्यांना स्पष्ट सांग, कीं कंठा मिळायचा नाहीं.

**वहिनी०**—ताई, असं बोलूं नये.

**तात्या०**—कान्ते, आज तुझं डोकं ठिकाणावर नाहीं कीं काय? आत्तांशा तुझ्या मनांत भलभलत्या कल्पना भरूं लागल्या आहेत हें मी पाहतों आहें. पण त्याचं कारणही मला माहीत आहे. या चळवळ्या रविकान्ताच्या संगतीचा तुझ्या मनावर कदाचित् परिणाम झाला असेल. ( रविकान्त हंसतो. ) अन् ही तुझी बोलभांड मावसबहीण चोवीस तास तुझ्याजवळ असल्यामुळं तिनंही तुझ्या सात्त्विक मनांत तामसी विचार भरविले असतील. ( तारा हंसते. ) पण तें असो. उद्यां तूं नानासाहेबांच्या घरीं जाऊन नांदूं लागलीस कीं तुझ्या मनावरचे हे सारे संस्कार नाहींसे होतील.

**कान्ता०**—( तारेस ) तारे, सांगूं का आत्तांच तात्यांना?

**तारा०**—( कान्तेस ) नको. आत्तांच नको. आत्तां तूं टाकली आहेस तेवढी ठिणगी पुरे.

**कान्ता०**—( तारेस ) पण, ज्यांच्या प्रेमाच्या भरंवशावर मीं हा धीटपणा अंगीं आणला आहे ते मला आपली म्हणतील ना?

**तारा०**—( तिच्याकडे व रविकान्ताकडे आळीपाळीनें पाहून ) किती वेडी तूं!

**तात्या०**—( नानासाहेबांस ) साहेब, कान्ता अविचारानं जें बोलली त्याबद्दल मीच आपली क्षमा मागतों. आपल्या कामांत व्यर्थ खोळंबा झाला. ( पत्नीकडे वळून ) मग, देतेस ना कंठा?—आटप.

**वहिनी०**—( स्वगत ) देवा, तूंच मला काय ती बुद्धि दे.

**तात्या०**—बोलत कां नाहींस? कंठा दिला नाहींस तर मैना रुसून निघून जाईल, जांवयांच्या आनंदाचा विरस होईल, माझ्या औदार्याला कलंक लागेल—

**कान्ता०**—( आईला बिलगून ) अन् आई, कंठा दिलास तर यांच्या खोट्या मोठेपणाच्या कल्पना पुष्ट होतील, पावित्र्यानं ओथंबलेला तो अलंकार भ्रष्ट होईल, अन् आपल्या घराण्याच्या अधःपाताला मदत केल्याचं पाप तूं पदरांत घेशील! आई, ही कसोटीची वेळ आहे. या वेळीं पतिनिष्ठेच्या वृथा कल्पनेनं तूं कंठा दिलास तर सरदार घराण्यांच्या

उद्धाराचा काल तूं आपल्या हातांनीं पुढं ढकलशील; अन् कंठा दिला नाहींस तर, यांची व्यसनाची कमान कोसळून नव्या युगाचं मंगल क्षितिज दिसूं लागेल.

**तात्या०**—कान्ते, पुरी कर तुझी वटवट. ( पत्नीस ) आटप. काढ तो कंठा.

**रवि०**—तात्यासाहेब, या दोन स्त्रियांच्या रूपानं निष्ठा आणि सद्वासना सुकुमार वेलींसारख्या एकमेकींला बिलगलेल्या पाहूनही तुमचा विवेक जागा होत नाहीं ? त्या कंठ्याचा—

**तात्या०**—अगांतुका, तुझी पिरपिर बंद कर म्हटलं ना !

**वहिनी०**—( स्वगत ) देवा, मी काय करूं म्हणजे पतिसेवा अन् सदाचार हीं दोन्ही मला साधतील ?

**तात्या०**—हं, काढ कंठा.

[ वहिनीसाहेब जड हातांनीं कंठा काढतात. त्यांच्या हातांतून तात्या-साहेब तो घेणार तोंच कान्ता पुढें होऊन तो झटकन् घेते. ]

**कान्ता०**—आई, तुला जें उत्तर तोंडानं देववत नाहीं तें मी तात्यांना माझ्या कृतीनं देतें. मी हा कंठा माझ्याच गळ्यांत घालतें, म्हणजे त्याचं पावित्र्य रक्षण करण्याचा मला पुरता अधिकार आला असं होईल. तूं हा मलाच देणार होतीस ना ?

**तात्या०**—तुझ्या गळ्यांत मी तो पट्टं देईन तेव्हां ना ? पुष्कळ झाली बडबड. दे तो कंठा इकडे.

[ असें म्हणून तात्यासाहेब कान्तेच्या हातांतील कंठा हिसकतात. त्या हिसक्यानें कंठा तुटतो व त्याचीं मोतीं इकडे तिकडे विखरून पडतात. ]

**वहिनी०**—हाय हाय ! हें काय केलंत आपण !

**तात्या०**—कंठा तुटला तर त्यांत काय मोठं ! हरभट, कर गोळा. हे असे सुटे दाणे मी मैनेच्या हातीं देईन, पण या घटकेला हट्ट पुरा केल्या-वांचून राहणार नाहीं. भंगलेली कांच सांधत नसेल, पण ओघळलेलीं मोतीं पटवायला काय उशीर !

**कान्ता०**—नाहीं, तात्या, मोती ओघळलं कीं ओघळलं. तुमच्या लहरी मनाला हा सारा पोरखेळ वाटत असेल; पण आत्तांच्या या अत्याचारानं आपल्या कुळाच्या अब्रूचीं उरलींसुरलीं सारीं मोतीं उकिरड्यावर मर्कटापुढं तुम्हीं टाकलींत असं समजा. तुमच्याविरुद्ध वागण्याचा धीर मला होत नव्हता. पण हा कंठा असा तोडून पितृभक्तीचं माझ्या मनांतलं अखेरचं बंधन तुम्हीं आपल्या हातानं तोडलंत. आतां निर्भय होऊन शुद्ध, स्वतंत्र विचारानं मला वागलंच पाहिजे.

(पडदा पडतो.)



# अंक दुसरा



## प्रवेश १ ला

[ नानासाहेबांच्या वाड्यांतील एक दालन. नानासाहेब व तात्यासाहेब बोलत बसले आहेत ]

**तात्या०**—म्हणून म्हणतों, साहेब, कान्तेच्या परवांच्या वर्तनाबद्दल आपण क्षमा केली पाहिजे; येवढंच नाहीं तर तिच्या अंगीं हा बंडखोरपणा ज्या मूळ कारणामुळं उद्भवला तें मूळ कारणच आपण नाहींसं केलं पाहिजे.

**नाना०**—तुम्ही इतक्या थराला गोष्टी जाऊं कशा दिल्या याचंच मला आश्चर्य वाटतं. कान्तेला तुम्ही शिक्षण दिलंत हीच मुळीं मोठी चूक झाली. अहो, शिक्षण म्हणजे वाघिणीचं दूध आहे. तें पिणाऱ्या माणसाला पारतंत्र्याच्या नरडीचा घोंट घ्यावासा वाटणारच. आमच्या श्रीमंतांना माझा नेहमीं सल्ला असतो, कीं उत्सव, दरबार, मिरवणुकी असल्या लोकांचे डोळे दिपवणाऱ्या गोष्टींवर लाखो रुपये खर्च झाले तरी चालतील; पण शिक्षणासाठीं एक पैसाही खर्चण्यापूर्वी दहादां विचार केला पाहिजे. शिक्षणासाठीं खर्च होणारा एकेक पैसा म्हणजे सत्ताधाऱ्यांनीं आपल्या सत्तेवर सोडलेल्या तिलांजलीचा एकेक थेंबच होय.

**तात्या०**—माझी चूक झाली खरी. पण आतां रविकान्ताकडे कान्तेचं जाणं येणं बंद करणं मला कठीण दिसतं. त्यापेक्षां आपणच हा रविकान्ताचा कांटा वाटेवेगळा सहज करूं शकाल. त्यांत आपलं धोरणही साधेल अन् आपला खाजगी हेतूही सफल होईल. ही गोष्ट आपणांस सुचविण्यासाठींच मीं मुद्दाम आपली गांठ घेतली.

**नाना०**—आनंदपूरच्या राज्याचे सर्वाधिकार मी चालवीत आहें. मला सुचणार नाहीं अशी युक्ति तुम्ही सुचवूं पाहतां—!

**तात्या०**—माझ्या बोलण्याचा आपणांस राग आलासा दिसतो. मी क्षमा—

**नाना०**—तसं नव्हे. तुम्ही सूचना करण्यापूर्वीच हा मार्ग माझ्या लक्षांत आलेला आहे. थोड्याच वेळापूर्वी मीं रविकान्ताला बोलावणं पाठवलं आहे.

( पट्टेवाला प्रवेश करतो )

काय रे !

**पट्टे०**—रविकान्त आले आहेत.

**नाना०**—आंत पाठवून दे. [ पट्टेवाला जातो. ] तात्यासाहेब, आतां जरा पहा या चळवळ्याला कसा खेळवतों तें ! अशीं हजार खेळणीं सोयी-प्रमाणं खेळवावीं तेव्हां सत्तेचीं सूत्रं हातीं टिकतात !

**तात्या०**—हः ऽहः ऽहः ऽऽ! आपण काऽऽय! आपलं काऽऽय! हः ऽहः ऽहः ऽऽ!

[ रविकान्त प्रवेश करतो. बाजूच्या एका खुर्चीवर बसण्यास नानासाहेब त्याला नुसत्या मानेच्या खुणेनें दर्शवितात. कांहीं वेळ कोणीच कांहीं बोलत नाहीं. ]

**नाना०**—कां, रविकान्त !—बोलत कां नाहीं !

**रवि०**—आपण मला बोलावून आणलंत, तेव्हां आपल्यालाच माझ्याशीं कांहीं तरी बोलायचं असणार.

**नाना०**—बोलायचं काय ! तुमच्याशीं बोलायच्या योग्यतेचीं तुम्ही माणसंच नाहींत.

**रवि०**—ठीक, मग मी जातों तर.

**नाना०**—हंः ! बघा तात्यासाहेब, लोक कसे उद्धट होत चालले आहेत. यांचा असला उद्धटपणा नरम करण्यासाठीं कडक उपाय योजले म्हणजे मात्र जगाला आश्चर्य वाटतं !

**रवि०**—नाहीं. सर्कशीच्या रंगणांत फटके खाणारा वाघ पाहून, फटके मारणाऱ्यापेक्षां ते खालीं मान घालून खाणाऱ्या वाघाचंच प्रेक्षकांना जास्त आश्चर्य वाटत असतं. पण तें असो. हें बोलण्यासाठीं मी आलों नाहीं. आपण मला कां बोलावलं तें लवकर कळेल तर बरं होईल.

**नाना॰**—मी तुम्हांला दहादां लेखी कळवलं तेंच शेवटचं निर्वाणीनं सांगण्यासाठीं तुम्हांला बोलावलं आहे. या तुमच्या मद्यपानबंदीच्या चळवळीबद्दल मीं आजपर्यंत विलायतेस श्रीमंतांकडे कसलाच रिपोर्ट केला नव्हता. त्यांची प्रकृति बरी नाहीं; त्यांच्या पोटाचं ऑपरेशनही लवकरच व्हायचं आहे. अशा वेळीं श्रीमंतांच्या मनाला पूर्ण स्वास्थ्य पाहिजे हें तर तुम्ही कबूल कराल ?

**रवि॰**—हो. नाहीं कोण म्हणेल ?

**नाना॰**—हां. वा ! तुमचं आमचं पुष्कळच एकमत होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. तेव्हां श्रीमंतांचं मन व्यग्र होऊं नये म्हणून तुमच्या चळवळीचं अवाक्षरही मीं त्यांना कळवलं नव्हतं. पण कशा कोण जाणे, त्यांच्या कानावर कांहीं गोष्टी गेलेल्या दिसतात. श्रीमंतांकडून आज तार आली आहे कीं, अशी अशी चळवळ चालल्याचं ऐकतों तेव्हां सविस्तर खुलासा तारेनं द्या.

**रवि॰**—मग आपण तार केलीत ना ?

**नाना॰**—नाहीं. तार करण्यापूर्वी तुमच्याशीं बोलणं व्हायला हवंसं मला वाटलं. म्हणून तर तुम्हांला बोलावलं. काय करावी तार असं तुम्हांला वाटतं ?

**रवि॰**—मद्यव्यापाराची पूर्ण बंदी व्हावी अशी आमची साधी, सरळ मागणी आहे हें आपण जाणतांच. तीच तारेनं कळवायची.

**नाना॰**—नाहीं, मी जरा निराळ्या तऱ्हेची तार करणार आहें. अन् तिलाच तुमची संमति मिळाली पाहिजे.

**रवि॰**—ती काय ?

**नाना॰**—मी श्रीमंतांना कळवणार आहें कीं, इकडे चळवळ वगैरे कांहीं नाहीं; श्रीमंतांनीं निराधार बातम्यांवर विश्वास ठेवून प्रकृतीला त्रास करून घेऊं नये. तुमची संमति आहे ना याला ?

**रवि॰**—आपला हा प्रश्न इतका विक्षिप्त अन् उपमर्दकारक आहे कीं

येथून मी ताबडतोब उठून निघून जाणं याखेरीज त्याला दुसरं निषेधाचं उत्तरच नाहीं.

**नाना०**—हं: ! एकदम माणसांतून उठून जायची आवड चळवळ्या लोकांत फारच वाढलेली दिसते. पण रविकान्त, असल्या आततायीपणांत काय अर्थ आहे ! श्रीमंतांच्या प्रकृतीला आराम असावा या दृष्टीनं चळवळ थांबवावी असं नाहीं तुम्हांला वाटत !

**रवि०**—पण ती थांबवणं माझ्यापेक्षां तुमच्याच हातीं अधिक आहे. दारूच्या विक्रीस बंदी केल्याचे हुकूम तुमच्याकडून सुटूं द्या, त्या क्षणीं आमची चळवळ थांबेल.

**नाना०**—पण दारूबंदी केल्यानं उत्पन्नाचं केवढं कलम खची होईल हें मीं तुम्हांला शंभरदां सांगितलं तरी तुम्ही लक्षांतच घेत नाहीं. आतां वेळच आली म्हणून इतकं हवं तर मी तुम्हांला आश्वासन देतों कीं, या सुधारणेसाठीं जादा कर द्यायला लोक तयार असतील तर तुम्ही म्हणतां तसे हुकूम मी ताबडतोब सोडीन.

**रवि०**—वा ! जादा कर बसवायचा आणि सुधारणा पदरांत टाकायची हें औदार्य अजबच आहे ! पण असली जादूमंतर हातचलाखी चालण्याइतके लोक भोळे राहिले नाहींत. लोकांचा तुमच्यावर स्पष्ट आरोप आहे कीं, एक अत्यवश्यक सुधारणा तुम्ही व्यर्थ कोंडून धरली आहे !

**नाना०**—हं: ! चळवळीच्या निशेंत वाटेल ते आरोप करायला काय लागतं आहे ! पण कारभाराच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करायची जबाबदारी ज्यांच्यावर आहे त्यांना तुमच्या मागणीचं ओझं किती मोठं आहे तें पाहिलं पाहिजे ना. तुम्ही मुळीं ध्यानांतच घेत नाहीं कीं दारूबंदीच्या पायीं जी तूट —

**रवि०**—नानासाहेब, तूट तूट म्हणून आम्हांला दबकावण्यांत काय अर्थ आहे ! केवळ तुटीचा बागुलबुवा दाखवून लोकांना भेवडावयाचा तुमचा डाव असेल तर, मीही पण वेळ आली म्हणून सांगतों कीं, कांहीं एक घटना घडून आली तर युरपच्या शास्त्रज्ञांकडून मला मोठं पारितोषक मिळणार आहे. श्रीमंतांच्या हवालीं मी असा करार लिहून द्यायला तयार

आई कीं, माझ्या पारितोषकाचे सगळे पैसे स्पर्शही न करतां जसेच्या तसे आनंदपूरच्या तिजोरींत मी भरणा करीन. मग तर झालं!

**नाना०**—वा! विलायती पांढऱ्या ढगांतून तुमच्यावर पडणाऱ्या काल्पनिक सरीचा हवाला देऊन आमच्या तिजोरींतली गंगाजळी फुगवायचा आव तर तुम्ही खूप आणला आहे!

**रवि०**—काल्पनिक सरीचा हवाला!—माझ्या शोधाबद्दल असले उद्गार!—पण तुमच्या बोलण्याचा काय राग मानायचा! माझ्या विद्येचं अन् शोधाचं महत्त्व तुम्हांला समजत असेल हा माझा अदमासच वेडेपणाचा होता. गिरिशिखरावरच्या मानससरोवरांत विहार करणाऱ्या हंसाचा मोत्यांचा चारा कसा असतो त्याची दरीच्या तळाशीं जीर्ण तृणांत सरपटणाऱ्या प्राण्यांना कुठची कल्पना असणार! पण नानासाहेब, केवळ जमाखर्चाच्या सबबीवर हा प्रश्न तुम्हांला फेटाळतां यायचा नाहीं हें मी पुन्हां बजावतों.

**नाना०**—म्हणजे! ही दारूबंदीची सुधारणा तिजोरींत तूट न येतां पार पडेल असं तुमचं म्हणणं आहे कीं काय?

**रवि०**—तसं कोण म्हणतो? पण हें पोकळ बुजगावणं उभारून एका आवश्यक सुधारणेचं गरीब पाखरूं हुसकावून देऊं पाहतां ते बाकीच्या गोष्टींत काय मोठी काटकसर वाया चालली आहे? जमाखर्चाच्या तुमच्या कडेकोटाला अनवश्यक उधळपट्टीचीं हजार भगदाडं दाखवतां येतील; तीं बुजवा, अन् मग आम्हांला पैशाची सबब सांगा. वायफळ षोकासाठीं भरती केलेल्या जनावरांची लीद गोळा करण्याकरितां जो खर्च होत असेल तेवढ्याची जरी बचत झाली तरी हा प्रश्न सुटेल. पाहुण्यांच्या शिकारी तळाच्या तंबूचे किनखापी तंग कमी झाले तरी ही सुधारणा सहज करतां येईल. तैनातदारांच्या अन् हुजऱ्यांच्या मंदिलांचे रंग जरा कमी भडक झाले तरी—

**नाना०**—बस्! रविकान्त, तुम्ही कोणापुढं काय बोलत आहांत याचं तुम्हांला भान आहे कीं नाहीं?

**रवि०**—हो, खरंच. प्रत्यक्ष श्रीमंतांनाच जे शब्द ऐकवायचे ते त्यांच्या तात्पुरत्या सत्ताधाऱ्यांना मीं ऐकवले हें चुकलंच; पण येवढं खास कीं, आमच्या

निरुपद्रवी सभांवर परवासारखे बंदीचे हुकूम बजावण्यांत, अन् आमच्या चळवळीला पायबंद लावण्याचा खटाटोप करण्यांत जेवढा पैसा खर्च होत असेल तेवढ्यांची जरी बचत झाली तरी दारूबंदी अंमलांत आणतां येईल.

**नाना॰**—पण या तात्त्विक वादासाठीं मीं तुम्हांला बोलावलंच नाहीं. श्रीमंत विलायतेंत आहेत, त्यांची प्रकृति बरी नाहीं. या दृष्टीनं तुमची चळवळ थांबवायला तुम्ही तयार आहांत कीं नाहीं?

**रवि॰**—श्रीमंत परदेशीं आहेत म्हणून इथल्या कोणकोणत्या गोष्टी थांबल्या आहेत? बड्या अधिकाऱ्यांच्या बढत्या तहकूब झाल्या आहेत? कां बड्या मानकऱ्यांच्या तैनाती बंद पडल्या आहेत? कां—

**नाना॰**—एकूण श्रीमंतांच्या मनःस्वास्थ्याची तुम्हांला कांहींच किंमत नाहीं म्हणायची!

**रवि॰**—हेच शब्द आपणांस विशेष पसंत असतील तर माझे विचार त्या शब्दांनीं आपण व्यक्त करा. माझा हेतू आपणांस समजला म्हणजे झालं.

**नाना॰**—तुम्ही गोष्टी निकरावर आणीत आहांत. आतां आम्ही निकराचे उपाय योजले तर आम्हांला दोष देऊं नका.

**रवि॰**—ठीक आहे. जातों. [ जाऊं लागतो. ]

**नाना॰**—थांबा, तुम्हांला दुसरी एक गोष्ट सांगायची आहे, अन् ती पहिल्याइतकीच महत्त्वाची आहे.

[ असें म्हणून नानासाहेब तात्यासाहेबांकडे पाहतात. तात्यासाहेब मोठ्या खुषीनें मान डोलावितात. रविकान्त थबकतो. ]

**नाना॰**—तुम्हां चळवळ्या लोकांची दानत कधीं नीट नसायची. नीतीनं नीटनेटका असलेला एकही पुढारी माझ्या पाहण्यांत नाहीं.

**रवि॰**—दुर्योधनाला दुनियेंत एकही सज्जन दिसला नाहीं.

**तात्या॰**—शाहण्याला शब्दाचा मार पुरतो. तुमच्यासारख्यांना तो पुरत नाहीं हेंच खरं. रविकान्त, स्पष्टच सांगतों, ऐका. तुमचं अन् आमच्या कान्तेचं एकमेकांकडे जाणं येणं आहे ना?

**रवि॰**—हो. कां?

**तात्या॰**—यापुढं तें जाणं येणं अजीबात बंद झालं पाहिजे.

**रवि०**—कान्तेकडे मला जातां येतं किंवा कान्ता माझ्याकडे येते हें मी आपलं भाग्य समजतों. प्रत्यक्ष देवाच्या दरबारचे हुकूम सुटले तरी हें भाग्य मी आपल्या हातांनीं दूर लोटणं शक्य नाहीं.

**तात्या०**—पण तिच्याविषयीं अभिलाष धरून तुम्ही वागत असाल अन् त्यामुळं तिच्या मनांतला सरदारी इभ्रतीचा अभिमान कदाचित् नाहींसा झाला, अन् समजा उद्यां ती माझ्या मनाविरुद्ध वागूं लागली--अं--अन्-

**रवि०**—आपण बोलतांना घोंटाळलांत तरी आपल्या मनांतला विचार मी समजलों.

**तात्या०**—नुसता समजून काय उपयोग ? कान्ता नानासाहेबांना अर्पण करावी असा माझा हेतु आहे. तो सफळ होण्याच्या आड तुम्ही आलांत तर-

**रवि०**—ती धन्य स्थिति मला प्राप्त होईल अशी आशा नाहीं. आपलं भय अन् माझा आनंद एकच आहेत. आपली भीति खरी ठरावी म्हणून अर्ध्या आयुष्याची ओवाळणी करायलाही मी तयार होईन.

**नाना०**--कान्तेवर मोहिनी टाकून आम्हां सरदारांच्या इभ्रतीला धक्का लावण्याची धिटाई तुम्ही केलीत तर खरोखरच अर्ध आयुष्य कमी होण्यासारखीं संकटं तुमच्यावर कोसळतील हें लक्षांत ठेवा.

**रवि०**--मीं मघाशींच सांगितलं आहे, कीं तुमची भीति व्यर्थ आहे. पण ती खरी आहे असं मानलं, अन् कान्तेच्या पाणिग्रहणाचं भाग्य मला लाभलं, तर त्यामुळं तुम्हां सरदारांची इभ्रत कमी कशी होते तें मला कळत नाहीं.

**तात्या०**--तुम्हां दरिद्र्यांना या गोष्टी कळायच्या नाहींत.

**रवि०**--तसं नव्हे तात्यासाहेब; पोकळ सरदारीच्या इभ्रतींत कळण्यासारखं कांहीं नसतंच असं म्हणणं अधिक उचित होईल. केवळ तात्त्विक वादासाठीं मी विचारतों, तुमची मुलगी माझी धर्मपत्नी झाली तर कोणाची इभ्रत वाढेल अन् कोणाची कमी होईल ? तुमची कीं माझी ? आज जगांत मान कोणाला आहे ? तुम्हांला कां मला ? जगांत प्रसिद्ध कोण आहे ? तुम्ही ? कां मी ? आनंदपूरच्या प्रजेचा कैवारी अन् शास्त्रीय शोधक या नात्यानं मला हजारों लोक ओळखतात ना ? तुम्हांला आज कोणत्या गुणांनीं

जग ओळखतं आहे ! तुमच्या मनांतला कुळाच्या दर्जाचा पोकळ डौल नाहींसा करण्याचे दिवस आतां आलेच आहेत. कुळाच्या मोठेपणाचं जुनं युग संपलं. हाताच्या कामानं अन् दिलाच्या हिमतीनं मोठेपणा मापण्याचं हें नवं युग आहे.

**नाना०**—वा, रविकान्त, दोन हिताच्या गोष्टी सांगण्यासाठीं आम्ही तुम्हांला बोलावलं, ते तुम्हीच आम्हांला शिरजोरीच्या गोष्टी सांगूं लागलांत ! नवल आहे !

**रवि०**—माझ्या हिताबद्दल आपल्याला कळकळ होती हें आपल्या बोलण्यावरून कांहीं कळण्यासारखं नव्हतं. आपल्यासारख्यांचे हिताचे उपदेश म्हणजे प्रच्छन्न उपदंशच होत !

**नाना०**—बस् बस्, रविकान्त, ज्यास्त बोलूं नका. जें बोललांत त्याबद्दलच पश्चात्ताप करायला आयुष्य पुरायचं नाहीं तुम्हांला. मी काय सांगितलं तें ध्यानांत ठेवा. श्रीमंत तिकडे आहेत तोंपर्यंत तुमची चळवळ अजिबात बंद राहिली पाहिजे. काय ?

**रवि०**—उत्तर द्यायची माझी इच्छा नाहीं.

**नाना०**—अस्सं ? बरं. अन् हें पहा, कान्तेबद्दल तात्यासाहेबांनीं जें सांगितलं तेंही नीट लक्षांत ठेवा. [ पट्टेवाला येतो. ] काय रे ?

**पट्टे०**—महत्त्वाचे कागद घेऊन चिटणीस आले आहेत.

**नाना०**—बसा. आलोंच म्हणावं. [ पट्टेवाला जातो. ] ( उठत ) ठीक आहे. रविकान्त तुम्हांला जायला परवानगी आहे.

[ सर्व जाऊं लागतात. ]

( पडदा )

---

## *प्रवेश २ रा

[ सरगम घोकीत पंचम प्रवेश करतो ]

**पंचम०**—छे ! ही तान कांहीं याद होत नाहीं ! ( भोंवतालीं पाहून ) आणि अजून या हरभटाच्याच घरापाशीं मी आहें ! सरगम घोकण्याच्या या

नादानं रोज तीन कोस जाऊन दोन कोस मागं येणाऱ्या अंकगणितांतल्या वाटसराप्रमाणं माझी स्थिति हळू हळू व्हायला लागली म्हणायची. अशा रीतीनं रविकान्ताच्या घरीं कलियुगांत पोंचायचं कांहीं चिन्ह नाहीं. त्याच्याकडे तर मला शक्य तितक्या लवकर गेलंच पाहिजे. कारण कोकिलेसाठीं साहस करण्याची मी प्रतिज्ञा केली खरी. पण तळकोंकणच्या जमिनींत गहूं-जोंधळ्याचं पीक निघणं जितकं कठीण तितकंच आम्हां गवयांच्या मेंदूंतून साहसाची कल्पना निघणं कठीण आहे. हे रविकान्त मोठे शास्त्रीय शोधक म्हणून नांवाजलेले. तेव्हां या साहसाच्या बाबतींत त्यांचा सल्ला घ्यायचं मीं ठरवलं. कोकिलेनं लावलेला हा साहसाचा पण मला किती जाचक होणार हें माझं मला माहीत. पूर्वी पुराणकालांत पणाची चाल होती. पण ते पण म्हणजे नुसतीं नाटकं असत. धनुर्भंगाचा पण पुरा केल्याबद्दल रामाची तारीफ कोण करीत असतील ते करोत; मी तर रामाला वाहवा द्यायला मुळींच तयार नाहीं. अहो, रामावतार होण्यापूर्वी विष्णूनं राम व्हायचं, लक्ष्मीनं सीता व्हायचं, मोडायची गुप्त युक्ति फक्त रामाला माहीत असेल. असं धनुष्य सभेंत ठेवायचं, या साऱ्या गोष्टी आगाऊ ठरलेल्या! मग रामानं तो पण जिंकला यांत काय मोठी मैफल मारली? उलट, मी कोकिलेचा पण जिंकला तर जगानं रामापेक्षांही माझी तारीफ केली पाहिजे. (बाजूस पाहून) हे कोण?—हरभट. यांना तोंड दाखवून उपयोग नाहीं. आपल्या साहसाचा सुगावा कोणालाही लागतां कामा नये. (विचार करून) अथवा आपल्या कामांत यांचाही सल्ला घ्यायला काय हरकत आहे?

[ हरभट प्रवेश करतो ]

**हर०**—(सुस्कारा टाकून स्वगत) हरी, हरी, हरी! पावलं तुटायला झालीं अन् छाती फुटायला झाली, तरी आमच्या या पोरीचं कुठं जुळेना! आतां करावं तरी काय? चिमीला यंदा उजवली तर पाहिजेच. पण ही सोळा वर्षांची झाली तरी कुंवारपणाचं गांव सोडून सौभाग्याच्या शहरांत हिचं पाऊल कांहीं केल्या पडत नाहीं. 'अष्टवर्षा भवेत् कन्या' या स्मृतिकारांच्या वचनाचा आठ वर्षांनीं झालेला हा अतिक्रम म्हणजे आमच्या धर्ममार्तंडत्वाच्या गांठोड्याला पडलेलीं आठ भोकंच म्हणायचीं. यजमा-

नांच्याबरोबर आम्ही वाटेल तें खातों, पितों. पण तें सारं वाड्याच्या भिंतींत. कपाळावरच्या या आडव्या गंधामुळं लोकांना त्याचा गंधही नसतो. पण न्हातीधुती झालेली ही सोळा वर्षांची धर्मभ्रष्टता घरांत वावरत आहे तिला काय करूं ? इतकी ही कुरूप पोरटी माझ्या पोटीं—म्हणजे आमच्या हिच्या पोटीं घालायला विधात्याला कोणता वेदांचा आधार सांपडला हें त्याचं त्याला माहीत ! पोरीचं लग्न कुठं तरी एकदां जुळवा म्हणून आमची ही सारखी टुमणं लावते. पण मी तरी काय करूं ? हजार थापा देऊन एखादं गिऱ्हाईक फुसलावून चिमीला पाह्यला म्हणून आणावं, तों चिमीचं दर्शन झाल्याबरोबर गिऱ्हाईक जें भीतीनं बेशुद्ध होतं तें चिमीला दाखवण्याचं काम बाजूलाच ठेवून त्याला डॉक्टरला दाखवायचं काम आधीं करावं लागतं. चिमीच्या सौंदर्यानं अशीं घायाळ झालेलीं गिऱ्हाइकं डॉक्टरला बोलावून सावध करण्यांत अन् घरीं पोंचवण्यांत माझी किती कमाई आजपर्यंत कमी झाली त्याची गणति नाहीं. माझी तर आतां खात्री झाली आहे, कीं सरळ मार्गानं कांहीं चिमीच्या गळ्यांत मंगळसूत्र पडायचं नाहीं.—

**पंचम**०—( पुढें होऊन ) नमस्कार. शास्त्रीबुवा, नमस्कार.

**हर**०—नमस्कार, नमस्कार. पण या वेळीं तूं रे इकडे कोणीकडे ? अन् असा चिंतामग्न कां ?

**पंचम**०—हं ऽऽ अ !

**हर**०—अरे ! अगदीं सुस्कारे टाकण्यापर्यंत मजल आली ?

**पंचम**०—शास्त्रीबुवा, हृदयाच्या विकारानं मी सध्यां अगदीं जर्जर झालों आहें हो !

**हर**०—काय म्हणतोस ? तरी मी नेहमीं सांगत असतों कीं तुम्ही गवई लोक उठल्या सुटल्या गातां खरे, पण तानांच्या ताणामुळं शेवटीं तुमची छाती तुमच्या तंबोऱ्याच्या भोपळ्यासारखी होईल.

**पंचम**०—तुम्ही माझं म्हणणं समजलां नाहीं शास्त्रीबुवा. हृदयाचा म्हणजे छातीचा विकार नाहीं झालेला मला. माझ्या विकाराचा अन् छातीचा कांहीं संबंध नाहीं. माझा हा विकार घालवायला मला कांहीं तरी छातीचं काम केलं पाहिजे येवढंच काय तें.




हरभटः—वेदांच्या आधारावांचून नाहीं बोलायचे आम्ही. [ पृष्ठ ४१

**हर**०—मी नाहीं समजलों.

**पंचम**०—नाहीं?—अं—शास्त्रीबुवा तुम्ही कधीं तरुण होतां का हो?

**हर**०—म्हणजे? आतां मी म्हातारा आहें कीं काय? श्रीमंतांच्या रंगेल सहवासामुळं माझ्या केंसावर जरा चंदेरी चमक आली असेल, वैराग्यशील वेदऋचा अहर्निश तोंडीं असल्यामुळं दांतांनीं विरक्त होऊन या जगावर पाठ फिरवली असेल, अन् माझ्या विद्येला शोभा यावी म्हणून माझ्या धोरणी शरीरयष्टीनं थोडा विनयही पत्करला असेल. पण वार्धक्याचा धक्का मला बसला आहे म्हणशील तर तें नाहीं हो मला खपायचं.

**पंचम**०—बरं, तें जाऊं द्या. पण शास्त्रीबुवा, एखादी मुसमुशीत तरुण स्त्री पाहून तुम्हांला कधीं असं वाटलं आहे का—कीं—

**हर**०—अस्सं! आपली स्वारी प्रणयजालांत सांपडली आहे एकूण! आत्तां मला कळला तुझ्या हृदयाचा विकार. पण काय रे, अशी कोण तुझ्या दृष्टीस पडली कीं जिच्यासाठीं तूं रात्रंदिवस झुरावंस?

**पंचम**०—त्या सुरसुंदरीचं वर्णन गद्यांत करणं म्हणजे घोर पातक होईल. ऐका,

## पद

**सुरलोकींचि परी नारी गहरी बरि प्यारी ॥ ध्रु० ॥ प्रिय भारि खुमारी रंगभरी ओठांची। नेत्रांनीं खुणवी प्रेमभरें तैं वाटे गोडी जीवा भारी ॥ १ ॥**

**हर**०—हें तिच्या सौंदर्याचं वर्णन झालं. पण तिचं नांव काय?

**पंचम**०—कान करा इकडे. (कानांत सांगतो.)

**हर**०—(दचकून) काय?—ती? पंचमा, अरे भलत्या स्त्रीचा अभिलाष धरलास. यांत तुझं कल्याण कधीं व्हायचं नाहीं. "न कदा दुर्लभस्त्रियोभिलाषः कल्याणाय।" असं ठणठणीत वचन आहे. वेदांच्या आधाराशिवाय नाहीं बोलायचे आम्ही! अरे हा विठ्ठलपंत कारकून, कारकुनाच्या शाईनं भरलेल्या हाताखेरीज दुसऱ्या कोणाच्याही हातीं आपल्या

पोरीचा हात देणार नाहीं. तुला आपली मुलगी द्यायला तर तो कधींच तयार होणार नाहीं.

**पंचम**०—पण शास्त्रीबुवा, तुम्हीच निःपक्षपातबुद्धीनं सांगा पाहूं, कीं विठ्ठलपंताला माझ्यांत असा कोणता मोठा उणेपणा दाखवतां येण्यासारखा आहे.

**हर**०—तुझा मोठा उणेपणा म्हणजे तूं गवई आहेस, अन् हा असा तंबोरा गळ्यांत अडकून ध्यानासारखा हिंडतोस.

**पंचम**०—बरं झालं हा प्रश्न काढलात. केव्हां तरी ही मळमळ निघायला हवीच होती. असा तंबोरा अडकवून मी हिंडतों म्हणून हंसायला लोकांची तयारी आहे. पण मी असं कां करतों याचा कोणी चवकस बुद्धीनं विचार करील तर शपथ. अहो, सध्यांचा काळच असा आहे कीं ज्यावरून आपला धंदा जाहीर होईल असा पोषाख प्रत्येकानं ठेवावा. दवाखान्यांत पेशंटच्या नांवानं शून्य असूनही डॉक्टर लोक रबराची नळी दस्तरुमालाप्रमाणें खिशाबाहेर डोकावती ठेवून मिरवतात ना? त्यांना नाहीं कुठं तुम्ही हंसत! एकाही अशिलाचा जोडा उंबरठ्यांत पडत नसूनही वकील लोक मारे डोक्याला पगडी अन् हातीं कागदाची जुडी असे मिरवतात कीं नाहीं? त्यांना नाहीं ते तुम्ही हंसत! डॉक्टराची नळी, वकिलाची पगडी अशा निरनिराळ्या धंद्यांच्या निशाण्या लोकमान्य झाल्या आहेत. मग आमच्याच धंद्याची तेवढी निशाणी कां नसावी? अशी एखादी निशाणी रत्नाकर ग्रंथांतून शोधून काढण्यांत कांहीं बडे पंडित गुंतले आहेत म्हणे! पण त्यांचे शोध पुरे होईपर्यंत थांबायला मी कबूल नाहीं, अन् म्हणून असा तंबोरा अडकवून मी हिंडत असतों. आधींच आमच्या धंद्याला इतकी निकृष्टावस्था आली आहे, कीं आमच्या तंबोऱ्याचा भोपळा दुनियेला कडू काल्यासारखा नकोसा वाटतो. अशा वेळीं आमच्या धंद्याची इभ्रत आमची आम्हीच वाढवायला नको?

**हर**०—अलबत; पण या गोष्टी विठ्ठलपंताला पटल्या पाहिजेत ना?

**पंचम**०—नाहीं पटल्या तर नाहीं. मीही त्यांची विनवणी न करतां कोकिलेला वश करायचं ठरवलं आहे. कारकुनाची मनधरणी करायला

मी कांहीं अशा तशा कुळांत निपजलों नाहीं. दुसऱ्या कशाबद्दल नसलं तरी अफाट आवाजीबद्दल आमचं घराणं फार विख्यात आहे. आमच्या बाबांची अशी गोष्ट सांगतात, कीं ते पहांटे उठून खर्जाची मेहनत करूं लागले कीं शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं घरं हादरूं लागायचीं, अन् गुलाबी साखर-झोंपेंत गुरमळलेलीं गुलजार जोडपीं धरणीकंपाचा भास होऊन दचकून उठायचीं ! आमच्या आजोबांच्या आवाजीची अशी आख्यायिका सांगतात, कीं ते जालंदरच्या जलशांत गायले तेव्हां गवई नाहीं, पण कित्येक स्त्रिया गर्भगलित झाल्या, अन् गांवांतल्या अडलेल्या बाळंतिणींची भराभर सुटका झाली. गवयांना अन् नटांना भडाभड पदव्या देणारे संपादक त्या काळीं नव्हते हो, नाहीं तर सिंह, वाघ, अस्वल, रानडुकर इत्यादि झाडून सारे हिंस्र पशु गायनाशीं समास करून आमच्या घराण्यांत खेळत राहिलेले तुम्हांला दिसले असते. अशा जबरदस्त कुळांतला मी आहें. विठ्ठलपंताच्या रुकाराची मी नाहीं किंमत ठेवायचा.

**हर०**—काय म्हणतोस !

**पंचम०**—हो. कारण कोकिला स्वतः मला अनुकूल आहे. एखादा पराक्रम मी करून दाखवून तिची मर्जी संपादन केली तर बापाला धाब्या-वर बसवून माझ्याबरोबर बोहल्यावर चढायला ती तयार आहे.

**हर०**—असं ?

**पंचम०**—अन् या बाबतींतच मला तुमची मदत पाहिजे आहे. शास्त्री-बुवा, मला एखाद्या साहसाची कल्पना सुचवाल तर माझा संसार थाटून दिल्याचं श्रेय तुम्हांला मिळेल.

**हर०**—( स्वगत ) याच्या या भाषणानं माझ्या डोक्यांत एक नामी युक्ति येऊं लागली आहे. ती जर सिद्धीला गेली तर माझ्या चिमीचं लोढणं या मूर्खाच्या गळ्यांत अडकवितां येईल, अन् याच्या हृदयाच्या विकाराचा फायदा घेऊन माझा हृद्रोग मला नाहींसा करतां येईल.

**पंचम०**—शास्त्रीबुवा, गप्प कां हो बसलांत ? सुचवा ना कांहीं कल्पना.

**हर०**—विचार करीत होतों रे.—अं—सुचवतों एक कल्पना. पण माझ्यावर तुझा पुरा विश्वास आहे ?

**पंचम०**---विश्वास ? एकदां तुम्हांला मसलतींत घेतल्यावर मग माझ्याकडून विश्वासांत कुचराई व्हायची नाहीं. तुम्ही सांगाल तें गानायचं एकदां ठरल्यावर गुजराथी बनिया एक सबंध मिरची खाऊन जिंदा राहिला म्हटलंत तरी खरं म्हणेन, हिमालय पर्वत पर्वतीच्या टेकडीहून ठेंगणे आहेत म्हणून सांगितलंत तरी हूं म्हणेन, किंवा एखादी संगीत परिषद बाचाबाची, मारामारी न होतां पार पडली म्हणालांत तरी मान डोलवीन. तुम्ही मात्र माझी मान कापूं नका म्हणजे झालं.

**हर०**---हरकत नाहीं. असं कर. ( विचार करीत स्वगत ) हां. असंच. ( उघड ) हें बघ, मी सांगेन त्या रात्रीं अन् सांगेन त्या प्रहरीं विठ्ठलपंताच्या घरांत शिरून कोकिलेला तिच्या शय्येवरून उचलून मी सांगेन त्या संकेतस्थलीं घेऊन ये. मीही त्या वेळीं तेथें येतों. तूं तिला घेऊन आलास कीं मी आपल्या हातांनीं देतों तुमचा विवाह लावून.

**पंचम०**---( तान मारून ) बहोत अच्छी ! मोठं काव्यमय साहस काढलंत डोक्यांतून शास्त्रीबुवा ! या साहसानं कोकिला प्रसन्न झालीच पाहिजे. पण शास्त्रीबुवा, हा असला विवाह शास्त्रशुद्ध होईल ना ? नाहीं तर---

**हर०**---हात् वेड्या, काय ही शंका ! विवाहाचा हा मार्ग अगदीं वेदोक्त आहे. " गांधर्वः स तु विज्ञेयो। " अन् " राक्षसो विधिरुच्यते। " अशीं ठणठणीत वचनंच आहेत मुळीं. वेदांच्या आधारावांचून नाहीं बोलायचे आम्ही ! गांधर्वविवाह अन् पैशाची विवाह यांच्या मिश्रणाचा एक प्रकार होणार आहे हा. मात्र या प्रकारांत ज्या स्त्रीचं हरण करायचं ती सर्व विधि पार पडेपर्यंत वस्त्रानं नखशिखान्त झांकलेली पाहिजे असा दंडक आहे. " विवाहार्थेऽवगुंठितप्रियाहरणम् । " असं ठणठणीत वचन आहे. वेदांच्या आधाराशिवाय नाहीं आम्ही बोलायचे !

**पंचम०**---( स्वगत ) ज्ञानोबांनीं ज्या रेड्याच्या तोंडून वेद ओकवले तो हाच कीं काय ?

**हर०**---त्या साऱ्या गोष्टी सांगतों तुला समजावून. चल आमच्या घरांत.

**पंचम०**---चला. ( स्वगत ) इच्छा सबळ असली कीं मदत घरीं चालून येते म्हणतात ती अशी. आतां रविकान्ताकडे जायची काय गरज

आहे ! ( उघड ) शास्त्रीबुवा, तुमच्या या साहाय्याबद्दल तुमची जन्मभर आठवण ठेवीन.

**हर०**—( स्वगत ) तुझी अन् माझ्या चिमीची जन्मगांठ घालून दिल्यावर माझी आठवण तुला साहजिकपणंच जन्मभर राहील. चिमीचा गळा मंगळसूत्रानं साजरा होणारसं दिसतं आहे. [ जातात. ]

( पडदा वर जातो )

---

# प्रवेश ३ रा

[ मध्यरात्रीची वेळ. चांदणें पडलें आहे. तात्यासाहेबांच्या वाड्यांतील मागील बाजूचा बगीचा दिसतो. मधून मधून असलेल्या वाटांपैकीं एका वाटेवर आरामखुर्ची टाकून कान्ता पडली आहे. तिच्या हातांत एक पुस्तक आहे. पण तें वाचण्याऐवजीं त्यांत तर्जनी घालून मिटून छातीवर टेकून ती चंद्राकडे पाहात विचार करीत आहे. ]

**कान्ता०**—( छातीशीं टेकलेलें पुस्तक खालीं करून मांडीवर टेकून ) अशीच मी किती वेळ विचार करीत राहणार !—अन् शिवाय, असं नुसतं स्वस्थ पडणं म्हणजे कांहीं विचार करणं नव्हे. विचार करायला म्हणून मी बसलें खरी, पण विचार करण्याऐवजीं कल्पनाचक्षूपुढची रविकान्तांची मूर्ति न्याहाळण्यांतच मी भान विसरलें. विचार एकदोन पावलं पुढं जातो न जातो तोंच त्याचा धागा संपून प्रेमाच्या चिंतनांतच मन रमून जातं. प्रेमाला मदिरेची उपमा देतात ती मला वाटतं यासाठींच. छे ! हा प्रेमाचा उन्माद कायम असतांना माझ्याकडून विचार कसला होणार ! एकदां वाटतं, विचाराचीं सारीं नीरस बंधनं तोडून टाकून कांहीं वेळ मनाच्या नौकेला प्रियचिंतनाच्या समुद्रांत खुशाल तरंगूं द्यावं. ( चंद्राकडे पाहून ) चंद्रा, माझं हें बोलणं ऐकून हंसलास ! कां हंसलास ! मी असंच करावं असं तूं सांगत आहेस ना ! प्रणयीजनांचा तूं जिवलग मित्र आहेस, तेव्हां

तूं सांगशील तें हितकरच असणार. पण माझी गोष्ट सामान्याहून निराळी आहे हें तूं विसरलास. मीं आपलं मन रविकान्तांना अर्पण केलं आहे. पण त्यांच्या मनाचा ठाव मला कुठं लागला आहे ! रात्रंदिवसाचा एकेक क्षण मी त्यांच्या नांवानं जपतें आहें. पण मोठमोठ्या शोधांत अन् लोकसेवेंत गुंतलेल्या त्यांच्या मनाला माझी आठवण क्षणभर तरी होत असेल का ! छे ! या शंकाकुशंकांनीं मन कसं बावरून जातं !

**पद** ( पटदीप; झपताल )

**अधिर मन बावरे, घेइ आंदोलनें । विविधभावांवरी प्रेम-शंकागुणें ॥ध्रु०॥ दयितहृदयांतलें अणु जरी लाभलें। स्थल, विसांवेल मन । कान्तगुणचिंतनें ॥ १ ॥**

चंद्रा, तूं माझा खरा मित्र आहेस ना ? मग माझी एक विनवणी मान्य कर. तूं आपल्या शीतकरांनीं रविकान्तांचं हृदय चाचपून पहा, अन् तिथं माझी आठवण आहे कीं नाहीं तें मला सांग. वायुलहरींनो, पश्चिमेकडून येतांना वाटेंत रविकान्तांच्या खोलींत डोकावा आणि ते एकान्तांत माझ्या-विषयीं विचार करीत असले तर धांवत येऊन मला सांगा. तुम्ही मला येवढं साहाय्य केलंत तर उद्यां वाङ्निश्चयाच्या वेळीं नानासाहेबांशीं मला लग्न करायचं नाहीं असं तात्यांना स्पष्ट सांगण्यापुरता खंबीरपणा माझ्या मनाला येईल. पण छे ! प्रेमविव्हल माणसाचं दुःख पाहण्यांत सुख मान-णारे तुम्ही मदनाचे मदतगार ! तुम्ही कसचं मला साहाय्य करणार !—काय करावं !—एखाद्या मंत्राची सिद्धि जवळ असती तर या वेळीं सूक्ष्म रूप धारण करून रविकान्तांच्या हृदयसंपुटांत शिरून आलें असतें.—किंवा रविकान्तच इथं आले तर !—किती वेडी मी. अशा भेटी कादं-बऱ्यांत किंवा नाटकांतच व्हायच्या.

[ पडद्यांत गलबला होतो व पिस्तुलाचे बारही ऐकूं येतात. ]

अगबाई ! हा गलबला कसला—

[ " मारो मारो " असे कांहीं लोकांचे शब्द, व " विश्वासराव, घाबरूं नका " असा रविकान्ताचा शब्द ऐकूं येतो. ]

काय !—हा रविकान्तांचाच शब्द नाहीं का !—हा दंगा—अन् त्यांचा हा शब्द—याचा अर्थ काय ! कांहीं दगाफटका आहे कीं काय !–( बाहेर डोकावून पाहाण्यासाठीं बाजूच्या भिंतीकडे जाते. )

[ पडदा पडतो. पडद्यापुढें असा देखावा दिसतो कीं पांचसहा बुरखेवाले इसम आणि रविकान्त व विश्वासराव यांजमध्यें चकमक चालू आहे. थोडा वेळ झटापट झाल्यावर बुरखेवाले लोक पळून जातात. ]

**रवि०**—नानासाहेबांच्या कुटिल नीतीची मजल येथपर्यंत गेली म्हणायची.

**विश्वास०**—मी म्हणतों हा प्रकार श्रीमंतांना तारेनं कळवावा.

**रवि०**—कळवून काय उपयोग !—अन् शिवाय माझ्यावरचं असलं वैय्यक्तिक संकट कळवून श्रीमंतांची मनःशान्ति बिघडविण्याची माझी इच्छा नाहीं.

**विश्वास०**—पण आजचा हा प्रकार म्हणजे कळस झाला.

**रवि०**—तरी तो सहन करण्यांतच आपल्या कार्याचा उत्कर्ष आहे. ( पडद्यांत पुन्हां बार होतो. ) अरे ! विश्वासराव, त्यांच्यापैकीं एकजण अजून आपल्या पाठीवर आहे वाटतं. ( पुन्हां बार होतो. ) घे चाण्डाळा ही परतभेट.

[ रविकान्त नेम धरून पिस्तुल उडवितो. आंतून "मेलों मेलों" अशी आरोळी ऐकूं येते. ]

**विश्वास०**—मला वाटतं त्याला वर्मी गोळी लागली.

[ पडद्यांत पुन्हां "मेलों ! अयाई !" असा शब्द होतो ]

**रवि०**—असं दिसतं आहे. तो घायाळ होऊन पडलेला असेल तर त्याला तसाच टाकून जाणं बरं नाहीं. या पाहूं इकडे. [ जातात. ]

[ पडदा वर जातो. आंत रस्त्याचा देखावा दिसतो. बदमाषांपैकीं एकजण विव्हळत पडलेला असतो ]

**बदमाष०**——अयाई ऽऽ! पाणी ऽ! पाणी ऽऽ!

[ रविकान्त व विश्वासराव प्रवेश करतात ]

**रवि०**——विश्वासराव, याला सावरून धरा पाहूं. याला आधीं पाणी पाजलं पाहिजे. पण इथं पाणी कसं मिळणार ?

**विश्वास०**——ही लगतची बाग तात्यासाहेब सरदारांच्या वाड्याच्या मागचीच मला वाटतं.

**रवि०**——खरंच. इथं आंत गेलों तर पाणी मिळेल कदाचित्. जाऊं का त्या भिंतीवरून उडी मारून ?——तुम्ही याला असा बाजूला घ्या बरं.

[ विश्वासराव जखमी बदमाषाला एका वुइंगमध्यें नेतो. रविकान्त दुसऱ्या बाजूच्या वुइंगमध्यें जातो. पडदा वर जातो व प्रवेशाच्या आरंभींचा बागेचा देखावा पुन्हां दिसतो. ]

**रवि०**——( प्रवेश करून ) कुठं बरं पाणी असेल इथं ? ( आराम-खुर्ची पाहून ) ही खुर्ची—हें पुस्तक ! इथं कोणी नुक्तंच वाचीत बसलं होतं कीं काय ?——पण पाणी कुठं मिळेल ?——

**कान्ता०**——( प्रवेश करून ) हें पाणी. पाहिजे आहे ना ?

**रवि०**—कोण ! कान्ता !——कीं माझ्या हृदयांतला विचार ओळखून प्रगट झालेली जलदेवता !——

**कान्ता०**——( स्वगत ) हृदयांतला हेतु ओळखतां आला असता तर अशी चिंता करीत कशाला बसलें असतें ? ( उघड ) आधीं हें पाणी हवं ना ?

**रवि०**——तूं मला आश्चर्यानं थक्क करून सोडलंस. थांब. हें पाणी त्या माणसाला पाजून त्याची विश्वासरावाबरोबर रवानगी करतों अन् परत येतों. ( दोन पावलें जाऊन मागें वळून पाहून ) पण देवतेप्रमाणं प्रगट झालीस तशी मी यायच्या आधीं गुप्त होऊं नकोस अं ! [ जातो. ]

**कान्ता०**——( स्वगत ) हें स्वप्न तर नसेल ? त्यांच्या निदिध्यासामुळं त्यांच्या दर्शनाचा हा भास तर मला झाला नसेल ? हें स्वप्न असेल तर यांतून जागृतिच यायला नको.



रविः—इतकं चित्तवेधक कसलं पुस्तक आहे तें? [ पृष्ठ ५०

पद ( काफी-देस; एकताल )

**किति सुखकर हा भास। हृद्यांतर करि उलसित। जाय विरुनि सकल ताप मनिचा। हा गोड ध्यास॥ ध्रु०॥ भ्रमचि रुचिर वाटत हा। जागृति विषसमचि गमत। मीलन जइ होत मधुर। जाय विरुनि इ० ॥ १ ॥**

पण हें स्वप्न नाहीं. त्यांनीं माझ्या हातांतून पाणी घेतलं तेव्हां माझ्या हातावर उडालेले हे थेंब अजून तसेच आहेत. त्यांचे ते कर्णमधुर शब्द अजून माझ्या कानांत घुमत आहेत. अन् त्या तिथं थबकून--अगबाई! ते तिथून हाललेच नाहींत कीं काय? कीं ते जाऊन परत आले तरी मी भ्रमिष्टासारखी उभीच आहें?

**रवि**०--( प्रवेश करून ) नाहीं, माझी देवता अजून गुप्त झाली नाहीं. ( तिच्या जवळ येऊन ) किती अकल्पित आपली भेट!

**कान्ता**०--मला तर ती स्वप्नासारखीच वाटते.

**रवि**०--मलाही ती कितीही सुखदायक वाटली तरी स्वप्नासारखीच मानली पाहिजे, आणि मन कितीही ओढ घेत असलं तरी इथं अधिक वेळ राहतां उपयोगी नाहीं. कारऽऽण--अं--तूं दुसऱ्याची वाग्दत्त वधू आहेस. अशा एकान्तांत तुझ्याशीं फार वेळ बोलणं बरं नव्हे.

**कान्ता**०—झाला हाच जगाच्या दृष्टीनं अतिक्रम ठरेल.

**रवि**०—तसं नाहीं. पण आतां गेलं पाहिजे. ऐनवेळीं तुझी मदत झाली याबद्दल आभार मानतों. येतों.

**कान्ता**०—ठीक. मीही आतां मघासारखी सुखाचं मनोराज्य करीत बसतें. ( खुर्चीवर बसते व पुस्तक उघडते. )

**रवि**०—( चार पावलें जाऊन परत येऊन ) जाऊं?

**कान्ता**०—हं! ( स्वगत ) किती निर्दय पुरुषांची जात!

**रवि**०—( स्वगत ) किती खोल मनाची बायकांची जात! ( उघड ) अं—म्हटलं--येतों.

**कान्ता०**—( पुस्तकांतून मान वर न करतां रागानें ) हं !

**रवि०**—इतकं चित्तवेधक कसलं पुस्तक आहे तें ?

**कान्ता०**—( पुस्तक दूर करून ) म्हणजे ?—मला वाटलं मी एकटीच आहें.

**रवि०**—माणूस विशेष आनंदांत असेल किंवा विशेष दुःखांत असेल तरच त्याला एकटं बसावंसं वाटतं.

**कान्ता०**—मग ?—मी विशेष आनंदांत नसेन कशावरून ?—

**रवि०**—उगीच कां स्वतःची व माझी वंचना करतेस ?

**कान्ता०**—वंचना कां ? या वेळीं मी आनंदांत कां नसावं ? नानासाहेबासारख्या खलपुरुषाशीं माझं लग्न होणार ! माझ्या साऱ्या सुखस्वप्नांचा चुराडा होणार !—माझं जीवित कायमचं कडू होणार !—याहून थोर भाग्य तें कोणचं ?—याहून मोठं सुख तें कोणतं ?—( बोलतां बोलतां तिचा स्वर रडवा होतो, डोळ्यांत अश्रू येतात, व हातांतील पुस्तक गळून पडतें. )

**रवि०**—हें काय ? मी तुला लागेलसं कांहीं बोललों ?—कान्ते,

**कान्ता०**—( स्फुंदत ) मला दुसऱ्याची वाग्दत्त वधू ठरविलीत—

**रवि०**—तुझ्या या आंसवांनीं माझ्या मनांतला संदेह पार धुऊन टाकला म्हणून तीं मला प्यारच वाटतात. पण कान्ते, तीं अधिक सांडूं नकोस, मला क्षमा कर, अन् मला खरंच सांग नानासाहेबांशीं ठरलेला विवाह तुला पसंत नाहीं ना ?

**कान्ता०**—दोन दिवसांपूर्वी या शेजारच्या कुंडींतल्या गुलाबाला एक सुंदर फूल आलं होतं. भ्रमर आपल्याजवळ येऊन गुंजारव करील अन् आपण आपला मधुर रस त्याला अर्पण करूं अशा उत्कण्ठ आशेनं तें फूल दोन दिवस झाडावर डुलत होतं. पण भ्रमरानं त्या फुलाकडे ढुंकूनही पाहिलं नाहीं, त्या फुलाची तीव्र निराशा झाली, अन् शेवटीं दुःखाच्या भरांत त्यानं मातींत उडी घेतली. त्या गुलाबाला मातीची संगति पसंत वाटली असं का म्हणायचं ?

**रवि०**—तुझा हा गुलाबाचा मार मी मोठ्या आनंदानं सहन करतों. पण माझं प्रेम तुझ्याजवळ उघड बोलून दाखवायचा धीरच मला होईना.

**कान्ता०**—तुमचं मन न ओळखतां मघांच्या वागण्यानं मीं तुम्हांला व्यर्थ दुखवलं. मला क्षमा होईल ना ?

**रवि०**—छे ! दृष्टि असून आंधळ्यासारखा, अन् वाचा असून मुक्यासारखा मी वागलों अन् तुझा इतका अंत पाहिला याबद्दल मीच तुझी क्षमा मागायला हवी.

**कान्ता०**--क्षमेचं देणं फक्त स्त्रियांनींच मागायचं असतं अन् पुरुषांनीं द्यायचं असतं. म्हणून मला क्षमा असावी अन् माझा स्वीकार करावा. म्हणजे तात्यांसमोर स्पष्ट बोलायला मला धीर येईल. आमची तारा नेहमीं म्हणते तेंच खरं, कीं कुजत चाललेल्या आमच्या सरदार घराण्यांचा उद्धार व्हायला हवा असेल तर आम्ही मुलींनींसुद्धां वेळींच जागं होऊन बंड केलंच पाहिजे. आम्ही स्वतंत्र बुद्धि दाखवली तरच नव्या युगाचा उदय होईल. या युगान्तरांत तुमच्यासारख्या कीर्तिवंतानं नायकाची भूमिका नको का घ्यायला !

**रवि०**--किती मधुर तुझं बोलणं ! तुझ्यासारखी नायिका दिसल्यावर नायकाची भूमिका घेण्याचा मोह प्रत्यक्ष देवांनादेखील होईल.

पद ( कर्नाटकी; त्रिताल )

**मधुर अशा ऐशा या । बघुनि विमला मुखचंद्राला ॥ ध्रु० ॥**
**रमण व्हाया । सुरलोकांतला । देव सहजीं । यावा क्षणाला ॥१॥**

( पडदा पडतो )

## अंक दुसरा समाप्त

# अंक तिसरा



## प्रवेश १ ला

[ गांवाबाहेरचें मारुतीचें देवालय. बुरख्यानें नखशिखान्त झांकलेल्या कोकिलेला खांद्यावर घेऊन पंचम प्रवेश करतो. ]

**पंचम०**—( कोकिलेला खालीं ठेवून ) हुश्! या कोकिलेचं ओझं इथपर्यंत आणतां आणतां अर्धा जीव झाला. बाकी अर्धांगी मिळवायसाठीं अर्ध्या अंगांतला जीव गेला तर काय बिघडलं ? कोकिले, लग्न झाल्यावर नवऱ्याच्या डोक्यावर साऱ्याच बायका बसतात. पण तूं मात्र लग्नापूर्वीच अक्षरशः माझ्या डोक्यावर बसून घेतलंस. शास्त्रीबुवांनीं सांगितलेल्या या स्थलीं कोकिलेसकट सुखरूप तर येऊन पोंचलों. वधूला नखशिखान्त झांकली पाहिजे अन् लग्न लागेपर्यंत वरानं तिच्याशीं अक्षरसुद्धां बोलतां कामा नये हा शास्त्रार्थ शास्त्रीबुवांनीं कुठला काढला कोण जाणे ! मी तर कोकिलेशीं बोलायला अन् तिचा मुखचंद्र पाह्यला इतका अधीर झालों आहें—करूं का हिचा बुरखा दूर ? शास्त्रीबुवा यायच्या आधीं एक शब्द जरी हिच्याशीं चोरून बोलायला मिळाला तरी प्रतिस्पर्धी गवयाच्या दहा अस्ताया चोरल्याचा आनंद मला होईल. कोकिले ! स् ! ए कोकिले ! जरा बुरखा दूर करून—( ती हातानें नको अशी खूण करते )—अग भितेस काय ? शास्त्रीबुवा अजून आले नाहींत तोंच—( ती नको म्हणून खूण करते )--किती भित्री तूं ! अग भय अन् लाज सोडणं हें तर प्रेमाचं पहिलं लक्षण आहे ! ( ती पुन्हां खूण करते ) बरं, राहूं दे. तुझी भीति एका अर्थी खरी आहे. शास्त्रीबुवांनीं आपल्याला बोलतांना पाहिलं तर त्यांचं मस्तक फिरून आपल्या मस्तकावर पडणाऱ्या अक्षता परत फिरायच्या. शास्त्रीबुवांनीं लग्नविधीसाठीं देऊळ तरी कोणतं शोधून काढलं पहा. मारुती-सारख्या कडक ब्रह्मचाऱ्याच्या साक्षीनं आमचं लग्न लावण्यांत या हरभटाचा काय हेतू असेल हरी जाणे ! बाकी, पुत्रप्राप्तीसाठीं झुरणाऱ्या बायका

अघळ पघळ शंभर पुत्र प्रसवणाऱ्या धृतराष्ट्राला नवस करण्याऐवजीं मारुति, दत्त अशा ब्रह्मचारी देवांच्या प्रदक्षिणांचीच पायपिटी करतात, तेव्हां शास्त्रीबुवांची ही योजना चुकीची नाहीं म्हणतां यायची. पण हे शास्त्रीबुवा अजून कां येईनात ? मला तर इथं आतां हळू हळू भीति वाटायला लागली आहे. रात्रीची ही अशी वेळ, शिवेबाहेरचं हें असलं ओसाड देऊळ, अन् बाईमाणूस बरोबर असलेला मी हा असा एकटा ! या बाजूला चोराचिलटांचा उपसर्ग फार आहे म्हणतात. दुसरं कांहीं नाहीं. चोरट्यांनीं कोकिलेला पळवली म्हणजे ऐन मैफलींत तंबोऱ्याची तार तुटून हातात खुंटी मात्र राहिल्यासारखं व्हायचं ! हा मारुति जागतं दैवत आहे म्हणतात. पण त्याचा काय नियम ? बोहल्यावर चढायला निघालेल्या वधूचं केवढं महत्त्व असतं त्याची या ब्रह्मचाऱ्याला कल्पना नसल्यामुळं कोकिलेच्या चोरीकडे हा खुशाल कानाडोळा करील ! तें कांहीं नाहीं. हरभट येईपर्यंत हरप्रयत्नानं मला जागं राहिलंच पाहिजे. गात बसावं झालं म्हणजे मनांतली भीतिहि कमी होईल अन् माझा आवाज लांबवर ऐकूं जाऊन हरभट त्वरेनें येईल.

**पद** ( मेघमल्हार; एकताल )

**आली शुभघटिका भली। पातली। प्रेमलग्नघाइ झालि, घाइ झालि ॥ ध्रु० ॥ मदनरंग उडवाया। रमणरमणि अधिर झालीं। बहुत हीं व्याकुळलीं ॥ १ ॥**

[ तो गात असतांना हरभट लग्नविधीला लागणारें साहित्य घेऊन प्रवेश करतो. पंचम गाण्यांत गर्क असतो. शेवटीं हरभट मागून त्याचा तंबोरा पकडतो. ]

**पंचम०**—( दचकून ) बाप रे ! चोर, चोर ! कोकिला गेली ! चोर !— ( मागें वळून पाहतो तों हरभट दृष्टीस पडतो. ) शास्त्रीबुवा हें हो काय ! भ्यालों ना मी.

**हर०**—अरे भ्यायला असलास तरी तसं दाखवूं नकोस. तूं आज कोकिलेला आपलं शौर्य पटवणार आहेस ना !

**पंचम०**—हो खरंच. बरं झालं या वेळीं बुरख्यामुळं कोकिलेची नजर

बंद झाली आहे. आपल्या शास्त्रांत सांगितलेली प्रत्येक गोष्ट आपल्या हिताची असते हेंच खरं. बरं पण शास्त्रीबुवा, आतां वेळ घालवूं नका. एकदां विधि लवकर उरकून टाका पाहूं.

**हर०**——विधि कांहीं फारसा भानगडीचा नाहीं. तूं असा इथं उभा रहा. कोकिला अशी समोर उभी राहील. या फुलांच्या माळा दोघंजणं हातांत घ्या, अन् माझे मंत्र संपले कीं एकमेकांच्या गळ्यांत घाला म्हणजे झालं. समजलं ना पंचमा. नाहीं तर ऐन माळ घालायच्या वेळीं सरगम घोकत बसशील !

**पंचम**०——वा ! कोकिलेपेक्षां सरगम अधिक आहे कीं काय ?

**हर०**——नाहीं, आपलं बजावलं. ( स्वगत ) येथपर्यंत तर ठीक जमलं. विठ्ठलपंताला मसलतींत घेऊन त्याच्या घरीं कोकिलेच्या जागीं चिमीला निजवून पंचमाकडून तिला इथं आणवण्याचा डाव तर साफ टाकल्या-प्रमाणं पडला. आतां कुमारी चिमी सौभाग्यवति होणार खास. बोहल्याच्या फलाटावर उभ्या असलेल्या चिमीला पंचमाच्या हातीं देऊन विवाहाच्या डब्यांत ढकलली अन् चार मंत्रांची शिटी फुंकली कीं सुटलों. मग यांच्या संसाराची गाडी खंडाळ्याच्या कड्याखालीं कोसळो नाहीं तर बोरघाटाच्या बोगद्यांत गड्प होवो. ( उघड ) हं, हें पहा. वधूवरांनो, आतां मी लग्नाचे मंत्र म्हणतों. पण त्यापूर्वी कोकिले तूं खुणेनं दर्शव, अन् पंचमा तूं सांग, तुमचं एकमेकावर अगदीं खरंखुरं प्रेम आहे ना ?

[ कोकिला होय म्हणून खूण करते. ]

**पंचम**०——शास्त्रीबुवा, ऐन मध्यरात्रीं हिला डोक्यावर घेऊन तीन मल धडपडत आलों यापेक्षां माझ्या प्रेमाचा पुरावा तो कोणता पाहिजे हो तुम्हांला ? अहो, तंबोऱ्याच्या जोडाच्या दोन तारांप्रमाणं जुळलेल्या आमच्या प्रेमाविषयीं शंका घेतां तुम्ही ? धिःकार असो तुम्हांला. धिःकार——

**हर०**——अरे रागावूं नकोस असा. शास्त्रांत सांगितलेलेच प्रश्न मी विचारतों आहें. वेदांच्या आधारावांचून नाहीं चालायचे आम्ही. आतां आणखी एक प्रश्न कीं संपलं. वधूवरांनो, विवाह कशासाठीं करायचा याचं तुम्हांला ज्ञान आहे ना ?

**पंचम०**---शास्त्रीबुवा, तुमचा हा प्रश्न म्हणजे आमच्या तारुण्याचा घडधडीत अपमान आहे.

**हर०**---अरे संतापूं नकोस. माझ्या प्रश्नाचा अर्थ असा कीं धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांच्या सिद्धतेसाठीं---धर्मार्थकाममोक्षेभ्यः !---विवाह करायचा असतो हें शास्त्रवचन तुमच्या दोघांच्या मनावर पुरं बिंबलेलं आहे ना ?

**पंचम०**---अहो यांत काय संशय ? मी तर या कोकिलेला नेहमीं सांगत असतों कीं धर्मार्थकाममोक्षेभ्यः असं शास्त्रवचन आहे, तेव्हां तुला काममोक्ष नको असला तरी निदान धर्मार्थ तरी माझ्याशीं लग्न लाव.

**हर०**---ठीक ठीक. मग या गांधर्वविवाहाला तुम्ही उभयतां पात्र आहांत खचित. आतां मी मंत्र म्हणतों तर. " अस्मिन् गांधर्वविवाहे---

[ पडद्यांत पाय वाजतात ]

**पंचम०**---( घाबरून ) शास्त्रीबुवा, कोणी तरी आलं वाटतं---

**हर०**---चल, वेडा ! कोणी नाहीं. आतां मधें बोलूं नकोस उगीच. हं. " अस्मिन् गांधर्वविवाहे वधूवर---

[ चोर प्रवेश करतात. " अरे बाप रे ! शास्त्रीबुवा, चोर ! " असें म्हणून पंचम बैठक मारतो. हरभट आ वासून पहात राहतो. कोकिला चुळबुळ करते ]

**चोरांचा नाईक**---लई नामी शिकार घावली. या भटाला अदुगर चांगला धरा. येच्याजवळ कांहीं तरी ऐवज असलाच पाहिजे. ( निरखून पाहून ) तात्यासाब सरदारांच्या घरचा भट दिसतुया हा. मोठ्यांच्या घरचं कुत्रंबी लुटण्यासारकं असतं. ए भटा---

**हर०**---अहो, काय लुटायचं असेल तें खुशाल लुटा. पण अशी अरे तुरे हांक मारलेली मी नाहीं सहन करणार. "सर्वेषु धनेषु मानधनं श्रेष्ठम्" असं ठणठणीत वचन आहे. चोर झालांत म्हणून काय झालं ? वेदांचा आधार सोडून मी नाहीं तुम्हांला वागूं द्यायचा.

**नाईक०**---( पंचमाकडे पाहून ) अन् ह्यो कोन ? कुनी गंजड गवई

दिसतुया. येच्या हातांत ही फुलाची माळ कशापायीं! अरच्या! तुमी काय हत लग्नाचा मांड मांडलाया जनू! ह्यो नवरा--अन् (कोकिलेकडे पाहून) ही नवरी जनु! (तिच्याजवळ जातो.)

**हर०**---नाईक, संभाळा. नवरीच्या जवळ गेलांत अन् तेवढ्यांत मी मंत्र म्हणून तिनं हातांतली माळ तुमच्या गळ्यांत टाकली तर ती तुमची लग्नाची बायको ठरेल हं!

**नाईक०**---मग येच्यांत भ्या काय दावतुस र? वाटमारी करणाऱ्या आमच्यासारख्यास्नी जिंदगीवानी जोरू पन प्यार असतिया! आजच्या लुटीमंदी ही नवी कोरी नवरी माझ्या पदरांत पडली तर तुम्हां दोघांस्नीबी मी लइ खुषीनं सोडूनश्यान दीन.

**हर०**---पहा बरं, मग मागं घेशील. (स्वगत) कोणीकडून चिमी संसाराच्या वाटेला लागली म्हणजे झालं. मग वाटचा लुटारू माझा जांवई झाला म्हणून काय बिघडलं? नाहीं तरी सासऱ्याला लुबाडण्याच्या कामीं प्रत्येक जांवई लुटारूच असतो. आधीं जांवई होऊन मग लुटारूपणा करण्याची नेहमीची रूढि पालटून हा आधीं लुटारूपणा करून मग जांवई होणार येवढाच काय तो फरक. (उघड) हं, नाईकसाहेब, व्हा पुढं, नवरी हवी ना?

**पंचम०**---वा, शास्त्रीबुवा! माझी बायको चोरांच्या हवालीं करून आपलं अंग चोरूं पाहतां होय? थूः तुमच्या शास्त्रावर! साधी थू नाहीं माझी पानतंबाखूची थू! पण तुम्ही असा भ्याडपणा केलात तरी मी कसा ऐकेन? ए चोरा, कोकिलेपासून दूर हो. तिला हात लावून माझा मत्सर जागृत करूं नकोस. आम्हां गवयांचा मत्सर फार भयंकर असतो. एखाद्या प्रतिस्पर्धी गवयाची गळेबाजी छातीवर बसूं लागली तर शेंदूर पाजून त्याचा गळा कापायला आमचा हात कांपत नाहीं!

**नाईक०**---बस कर पोरा वटवट. धरा र या आचरटाला. नवऱ्याच्या डोळ्यासमूर त्येची ताजी नवरी नासायची संधि दवडली तर आम्ही पिढीजाद लुटारू कसल!

[ नाईक पुढें होऊन कोकिलेचा बुरखा दूर करूं लागतो. पंचम " चाण्डाळा ! खबरदार " असें ओरडतो. हरभट पुन्हां " अस्मिन् गांधर्व-विवाहे " वगैरे मंत्र मोठ्यांदा म्हणूं लागतो. बुरखा दूर होतांच कोकिला दिसण्याऐवजीं अत्यंत काळी, हिडिस चिमी दृष्टीस पडते, व ती नाइकाच्या गळ्यांत घालायसाठीं माळ पुढें करते ]

**नाईक**०—( दचकून मागें सरून ) अर बाप र !

**पंचम**०—अरे बाप रे ! कोकिला म्हणून धरून आणली अन् निघाली चिमणी ! हें हो काय शास्त्रीबुवा ? या मेघमल्हार रागिणीला का डोक्या-वर घेऊन मी तीन मैल आलों ! हाय हाय ! माझ्या ब्रह्मचर्याला लाग-लेला हा काळा कलंक आतां कसा धुऊन निघणार !

**हर**०—चिमे, बेटा गोंधळून जाऊं नकोस. तुला वाटेल त्याला माळ घाल. मी मंत्र म्हणतों. " भूमिजलतेजपवमानान् साक्षी कृत्वा—

**नाईक**०—ए भटा, मंतुर बंद कर. द्या र त्येला सोडून. अन् त्या गवयाच्या कार्ट्यालाबी सोडा. चला, पळा. आतां हत खिनभरबी राह्यची सोय नाय. या हिडिंबेची लगीनमाळ गळ्यामंदी पडण्यापरीस यमाचा फांस गळ्याला लागला त काय वाईट ? [ नाईक व चोर जातात. ]

**पंचम**०—( स्वगत ) आतां काय करावं ? बाहेर पळावं तर चोरटे प्राण घेतील. इथंच रहावं तर या कालिकेचा प्राणनाथ व्हायची पाळी येईल. या जखणीशीं चतुर्भुज होण्यापेक्षां चोरट्यांनीं चतुर्भुज केलेलं पुर-वलं. लग्न होऊन हिच्या मांडीवर मान ठेवायची पाळी येण्यापेक्षां आतांच लुटारूंनीं मान कापली तरी हरकत नाहीं. [ पळून जातो ]

**हर**०—चिमे, माझे आई, आतां मात्र सारे उपाय संपले. वाटचा चोरसुद्धां तुला पत्करीना ! तुझ्या कौमार्याची दोरी मोठी बळकट दिसते ! तुझ्या पत्रिकेंत तुझं पतिस्थानच हरवलं आहे मला वाटतं ! आतां खंडो-बाची मुरळी होऊन रहा. दुसरं काय सांगूं ?

[ चिमी डोळे वटारून बापाकडे पाहते. ]

( पडदा )

---

## प्रवेश २ रा

[ तात्यासाहेबांच्या वाड्यांतील व्हरांडा. तात्यासाहेब व विठ्ठलपंत बोलत उभे आहेत. ]

**तात्या०**—विठ्ठलपंत, तुम्ही म्हणतां तें खोटं नाहीं. आज मला अपार आनंद होत आहे. आणि तसा कां होऊं नये ! मीं कित्येक दिवस जें मनाशीं मोठ्या आशेनं योजलं तें आज होणार. आजचा हा साखरपुड्याचा समारंभ झाला कीं माझी लेक नानासाहेबांची झालीच, नाहीं कां !

**विठ्ठल०**—आपल्या आनंदाला साजेलसा थाट आपण उडवून दिला आहे खरा. समारंभासाठीं शृंगारलेल्या पलीकडील दिवाणखान्यांत गेल्या-बरोबर एखाद्या राजवाड्यांतल्या अंतःपुरांत पाऊल टाकल्यासारखं वाटतं.

**तात्या०**—आमच्या कान्तेचं भाग्यच मोठं म्हणून नानासाहेबांसारखा पति तिला लाभला. कूळ खानदानी सरदाराचं, संपत्ति कुबेरासारखी, अन् सत्ता तर काय, संस्थानचे राजे तेच आहेत आज. आपण केवढ्या ऐश्वर्यांत जाऊन पडणार आहोंत याची कान्तेला कल्पना नसली तर आज साखरपुड्याच्या वेळेस घालण्यासाठीं म्हणून जे आहेराचे वस्त्रालंकार नाना-साहेबांकडून आले ते पाहतांच तिला उमज पडेल. धाडलेत ना ते तिच्याकडे !

**विठ्ठल०**—तर ! आपल्याला दाखविले अन् लगेच माझ्या कोकिलेच्या हातीं ते मीं ताईसाहेबांकडे धाडले. ताईसाहेबांचं भाग्य आपण मघांशीं म्हणालांत, पण मी तर म्हणतों त्या वस्त्रालंकारांनीं नटलेल्या ताईसाहेब दृष्टीस पडतांच आमच्या साहेबांनाही केवढं आपलं भाग्य असं वाटेल.

**तात्या०**--यांत काय संशय !—बरं, मी आतां दिवाणखान्याकडे जातों. निमंत्रित सरदारमंडळी येऊं लागली असतील. नानासाहेबदेखील यायला फार अवकाश नाहीं आतां. कान्ता तयार झाल्याचं तुम्हांला कळ-ल्याबरोबर मला येऊन वर्दी द्या.

**विठ्ठल०**—ठीक आहे. आपण जावं.

[ एका बाजूनें तात्यासाहेब जातात; व दुसऱ्या बाजूनें दागिने व शालू घातलेलें चांदीचें तबक हातांत घेऊन कोकिला प्रवेश करते. ]

**विठ्ठल०**—हें काय ? हें तबक घेऊन परत काय आलीस ?

**कोकिला०**--छान ! म्हणजे वायुलहरीप्रमाणें फडफडणाऱ्या पालवीसारखी आमची गत आहे म्हणायची ! कान्तातार्इसाहेबांनीं शृंगार करावा अशी आमच्या यजमानांना लहर आली म्हणून मी तबक घेऊन तिकडे गेलें. शृंगार न करण्याची तार्इसाहेबांना लहर आली म्हणून तेंच तबक घेऊन इकडे फिरलें. अन् आतां--

**विठ्ठल०**--म्हणजे ?--सांगतेस तरी काय तूं ?--कान्तातार्इंना हा शालू नेसायचा नाहीं ?--हे दागिने घालायचे नाहींत ?

**कोकिला०**--हें तबक मीं त्यांच्यापुढं नेऊन ठेवलं अन् भावी यजमानांकडून आलेला हा आहेर अंगावर घालावा अशी विनंति केली तेव्हां त्या अन् जवळच बसलेल्या ताराबार्ई कसंसंच हंसल्या, अन् त्यांनीं तिरस्कारानं तबक दूर लोटून दिलं.

**विठ्ठल०**--खरं ?

**कोकिला०**--मग मी पुष्कळ वेळ वाट पहात तशीच उभी राहिलें, पण त्यांनीं तबकाकडे ढुंकूनही पाहिलं नाहीं. कसल्याशा सभेबद्दल त्यांचीं अन् ताराबार्इचीं बोलणीं चाललीं होतीं तीं संपेनातच. शेवटीं मी कंटाळलें अन् निघालें तेव्हां तार्इसाहेब म्हणाल्या, हें तबक माझ्या दृष्टीसमोरसुद्धां नको, घेऊन जा. मग मी काय करणार !

**विठ्ठल०**--छे छे ! हीं चिन्हं कांहीं ठीक दिसत नाहींत. हा प्रकार तात्यासाहेबांच्या कानावर घालावा तर त्यांचा राग भडकून भलताच कांहीं प्रकार व्हायचा--बरं न घालावा तरी--कसं करावं बरं !--

**कोकिला०**--बाबा, हे दागिने तार्इसाहेबांना नकोत, मग त्यांतले एकदोन मी घालूं का जरा वेळ ?--आज इथं पंचम कुठं तरी साहजिक भेटणारच. त्यांच्या दृष्टीस पडतांना अंगावर दोन ठळक दागिने असले--

**विठ्ठल०**—हात् कारटे ! त्या पंचमाचा नाद कांहीं तुझ्या डोक्यांतून

अजून जात नाहीं ना ? पोरी, कारकुनी घराण्याचं नांव तूं बुडविणार कीं काय !

**कोकिला०**––पण बाबा, त्यांत घराण्याचं नांव कसं बुडणार मला कळत नाहीं.

**विठ्ठल०**––अग, लेखणी कानावर ठेवून सरदारांच्या जमीनजुमल्यांचे व्यवहार पाहणारे आम्ही कारकून, अन् तंबोरा कानाशीं लावून अस्मानांत सुरांच्या कोलांट्या मारणारे गवई, यांच्यांत जमीन अस्मानाचं अंतर आहे हें कसं तुला समजेना ? गवयाचा नाद गाण्यांत शोभत असेल, पण माझ्यासारख्या अस्सल कारकुनाच्या मुलीला तो लागलेला मला खपायचा नाहीं हो ! हं चल, हो पुढं. ( स्वगत ) ताईसाहेबांची ही बातमी आतां कुणाच्या कानावर कशी घालायची ? मोठी पंचाईत आली. [ जातात. ]

( पडदा वर जातो )

---

## प्रवेश ३ रा

[ कान्तेची खोली. कान्ता व तारा कपडे करून कोठें तरी बाहेर जावयाच्या तयारींत आहेत. खोलीच्या पलीकडल्या बाजूस असलेल्या खिडकींतून तारा मधून मधून बाहेर पहात आहे. कान्ता बाजूच्या एका भिंतीस लावलेल्या आरशांत पाहून केंस व गळ्यापासचें पोलकें व दागिने नीटनेटके करीत आहे. तें करीत असतां नाटकाच्या प्रारंभींच्या पदाचा "कुलसाधित वैभवांत" वगैरे अंतरा ती मोठ्या आनंदभरानें मनाशीं गुणगुणत आहे. ]

**तारा०**––( खिडकीजवळूनच ) आटपा हो बाईसाहेब, आटपा म्हटलं. पुरे झाला नट्टापट्टा. सभेच्या जागीं केवढी गर्दी उसळली आहे पाहिलीत का ! उशीर नको आतां. ( कान्ता आपल्याच नादांत गुणगुणत राहते.

म्हणून तिच्याजवळ येऊन ) अहो बाईसाहेब, उशीर होत चालला आहे. गाण्याची-तान राहूं द्या आतां.

**कान्ता०**—( तिचा हात हातांत घेऊन हंसत ) तान राहूं दे !—या वेळीं तर वाटतं आहे स्वैर पाखरासारखी भरारी मारावी अन् सुस्वराचं छत पसरून मनांतला आनंद व्यक्त करावा.

**पद** ( मांड; एकताल )

**घेइ विहगसम भरारि मानस हें भारी ॥ ध्रु० ॥**
**उन्मादक गीताचें । छत सुंदर पसरावें ।**
**वाटे या क्षणिं मनास । मन वेडें, बाई ॥ १ ॥**

तारे, स्वतंत्र व्हायचं नुसतं ठरविल्याबरोबर इतका उल्हास येतो, मग प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा आनंद केवढा असेल !

**तारा०**—पण तुझ्या आत्तांच्या आनंदाचं मूळ स्वातंत्र्यापेक्षां प्रेमांतच दिसतं आहे. सभेला जाण्याच्या कल्पनेपेक्षां तिथं रविकान्त भेटतील या कल्पनेनंच तूं अधिक आनंदित झाली आहेस.

**कान्ता०**—काढलंस का कांहीं तरी !

**तारा०**—कांहीं तरी कां ?—तसं नसतं तर निघण्यापूर्वी तूं पुन्हां पुन्हां आरशांत पाहिलं नसतंस. नुसतं सभेंत भाषण करण्यासाठीं निघालेली चेहऱ्यापेक्षां आपल्या भाषणाच्या टापटिपीकडेच लक्ष देईल.

**कान्ता०**—तुझ्याशीं वाद कुणी घालावा ? बरं, आतां आरशांत अगदीं न पाह्यची प्रतिज्ञा करतें. मग तर झालं ? हं, चल. [ दोघी हातांत हात घालून खोलीच्या दाराकडे जाऊं लागतात. दोनचार पावलें गेल्यावर कांहीं आठवण झाल्यासारखें करून कान्ता थबकून उभी राहते. ]

**तारा०**—काय ग ?

**कान्ता०**—( पोलक्याचे खिसे एकदोनदां चांचपून ) इश्श ! सारंच मुसळ केरांत !

**तारा०**—काय झालं !

**कान्ता०**—अग मी आपल्या भाषणाचीं टांचणं केलीं होतीं ते कागद घ्यायला विसरलेंच.

**तारा०**—मग ! राहिनात कां—चल.

**कान्ता०**—शाबास ! जन्मांतला सभेंत बोलायचा हा पहिला प्रसंग माझा.

**तारा०**—अग, अंतःकरणाला पटलेली खरीखुरी गोष्ट बोलायची असली म्हणजे वक्तृत्व आपोआप येतं म्हणतात.

**कान्ता०**—नको बाई. भाषणाच्या वेळीं माझी फजीती झाली तर लोक काय म्हणतील !

**तारा०**—लोक म्हणजे रविकान्त काय म्हणतील, असंच ना !

**कान्ता०**—बरं, तसं कां म्हणेनास. पण कागद घेतें गडे बरोबर. (तिला सोडून टेबलाकडे जाते. घाईनें त्याच्यावरचीं पुस्तकें व कागद चाळविते. मग दोन्ही खण भराभर उघडून पाहते.) हें काय ! इथेंच ठेवले होते मी !—आंतल्या खोलींत अंथरुणाच्या उशागतीं तर नाहीं राहिले !—तारे, उभी रहा अं. आलेंच. (घाईनें आंतल्या खोलींत जाते.)

**तारा०**—परवांच्या त्या कंठ्याच्या प्रकारापासून हिची स्वतंत्रबुद्धि पुरी जागृत झाली. त्या दिवशीं सभेला नुसतं हजर राहण्याबद्दल रविकान्तांनीं विचारलं तर ही विचारांत पडली. पण आजच्या सभेंत भाषण करायचं त्यांनीं विचारतांच हिनं चटकन कबूल केलं.

**पद** (तिलंग; एकताल)

**भाग्यदायि परम विमल वरितां स्वातंत्र्यमंत्र । दुहिता करि धन्याचि कन्यापदासि ॥ ध्रु० ॥ प्रणयालंकृत वरासि अर्पी तनुजा तनूसि । थोर विभव ये कुलासि ॥ १ ॥**

रविकान्ताच्या या प्रचण्ड जाहीर सभेचा दिवस अन् तात्यासाहेबांनीं ठरविलेला वाङ्‌निश्चयाचा दिवस एकच आला हा योग मोठा छान जुळला. आतां प्रसंग उडालाच तर अगदीं कडाक्याचा उडणार !

[ आंतल्या खोलींतून बाहेर पडतांना " सांपडले बाई. नाहीं तर मी अशी घाबरलें होतें ! " असें कान्ता अर्धवट आपल्याशीं उद्गारते. मग ती लगबगीनें तारेजवळ येते व " चल. उगीच खोळंबा झाला, नाहीं !" असें म्हणते. दोघी मघांप्रमाणें हातांत हात घालून दाराकडे जाऊं लागतात. त्याच वेळीं त्या दारांतून वहिनीसाहेब प्रवेश करतात, व त्यांच्या मागोमाग दागिन्यांचें तबक हातांत घेऊन कोकिला येते. ]

**वहिनी०**—या दोघी तर तयार आहेत ! ( कान्तेकडे पाहून ) तूं बसून राहिली आहेस असं कसं मला विठ्ठलपंतांनीं सांगितलं ? चल. पण हें बघ, आज घरच्याऐवजीं हे आहेराचे दागिनेच घालायला पाहिजेत हो. आण ग कोकिले इकडे तें तबक. ( कोकिला तबक पुढें करते. ) नानासाहेबांच्या घरांत दृष्ट लागण्यासारखं जवाहिर आहे म्हणतात तें खोटं नाहीं. ताई, आटप.

**कान्ता०**—आई, माझा पोषाख झालेला पाहून तुला वाटलं असेल मी वाङ्‌निश्चयासाठीं तयार आहे. तसं नाहीं. रविकान्तांची जाहीर सभा आत्तांच आहे. तिकडे मी चाललें आहे.

**वहिनी०**—काय ? म्हणतेस तरी काय ? छे, छे ! हें बरं नाहीं. ताई, माझं ऐक. हे दागिने घाल आधीं.

**कान्ता०**—आई, काल आपण बोलत बसलों होतों तेव्हां मर्यादा सोडूं नये ती सोडून तुझ्याजवळ मीं अंतःकरण उघड केलं तरी तूं मला हेंच सांगतेस !

**वहिनी०**—ताई, कांहीं झालं तरी पुरुषांच्या आज्ञेत राहून त्यांना आनंद देणं हेंच स्त्रियांचं खरं कर्तव्य आहे.

**तारा०**—मावशी, असल्या वेदान्तामुळेंच जुन्या युगाचा जुलमी अंधेर अजून ठिकठिकाणीं रेंगाळत आहे बरं !

**वहिनी०**—तारे, तूं पोरकट आहेस. ताई, उगीच अविचार करूं नकोस. निमंत्रित मंडळी केव्हांपासून दिवाणखान्यांत जमली आहेत. नानासाहेबही आलेच असतील किंवा आतां येतील. अशा वेळीं तूं हें काय मांडलं आहेस बरं !

**कान्ता०**---आई, मला नाहीं कां उलट विचारतां यायचं तुम्ही हें काय माडलं आहे म्हणून ! तिकडे त्या खिडकींतून पहा, आमच्या सभेला कोण गर्दी लोटली आहे; आमची सभा घटकेंत सुरू होईल; आमची सभा--

[ तात्यासाहेब, विठ्ठलपंत व हरभट प्रवेश करतात ]

**तात्या०**—सभा ! –कसली सभा ! तिकडे सारी मंडळी खोळंबली आहेत अन् इथं सभेचीं बोलणीं चाललीं आहेत !—हें आहे काय ! ( दागिन्याकडे व कान्तकडे आळीपाळीनें पाहून ) विठ्ठलपंतानं सांगितलं तें खरंच तर ! कान्ते, हा पोरकटपणा मला खपायचा नाहीं. वाङ्निश्चयाच्या समारंभाला ताबडतोब आलं पाहिजे तुला.

**कान्ता०**---मी त्या समारंभालाच निघालें आहे. जाऊं द्या मला.

**तात्या०**---म्हणजे ?

**कान्ता०** –म्हणजे मी आज खरोखरच वाङ्निश्चय करणार आहे. मात्र तुमच्या मताप्रमाणें नव्हे, तर जनतेची, अन् त्या जनतेच्या सेवेला ज्यांनीं स्वतःला वाहून घेतलं त्या रविकान्तांची आजन्म सेवा करण्याचा वाङ्निश्चय आज मी करणार आहें.

**तारा०**---तुझ्या या वाङ्निश्चयाच्या समारंभाला तूं तात्यांना कां निमंत्रण देत नाहींस ? ( हंसते. )

**तात्या०**—तारे, तुमच्या दोघींच्या अकलेचे तारे आज फारच तुटताहेत. कान्ते, अजून तुझी चूक तुला दुरुस्त करतां येईल. वेळ घालवूं नकोस. तिकडे सगळी मंडळी---नानासाहेबसुद्धां—येऊन खोळंबून बसली आहेत. हं. घाल हे दागिने.

**कान्ता०**---मीं मनानं रविकान्तांना वरलेलं आहे. हे दागिने मला परपुरुषाच्या स्पर्शाइतकेच किळसवाणे वाटतात.

**तात्या०**—तुझा मेंदू बिघडला आहे कां झालं आहे तरी काय ! माझ्यासारख्या पहिल्या प्रतीच्या सरदाराच्या कुळांत जन्माला येऊन तूं एका भिकाऱ्याचा संसार साजरा करणार !

**कान्ता०**—सरदार कुळांतल्या माझ्या जन्माची मला फिरून फिरून कशाला आठवण करून देतां ! अंगाखांद्यावर घालायच्या या दागिन्या-

सारखं हें कुळाचं लेणं घालतां काढतां येण्यासारखं असतं तर तें दूर फेंकून द्यायला मीं क्षणाचाही विलंब केला नसता.

**पद** ( बहार; तिताल )

**फोल हा फोल । कुलधनपदमद् । मूढचि गणि थोरवी ही । मज परि नच सहन मुळिं सोवितां ॥ ध्रु० ॥ खलकृति करी हीन । जरि वरि कुमति अधिकार । कटुफलमय पाप-मार्ग घोर घोर ॥ १ ॥**

**तात्या०**—कारटे, माझ्या कुळाला तूं काळिमा लावणार कीं काय ! नानासाहेबांसारख्या सत्ताधारी सरदारापेक्षां तो दरिद्री रविकान्त तुला अधिक प्रिय वाटला ?

**कान्ता०**—खोट्या जन्मसिद्ध मोठेपणापेक्षां साध्या कर्तबगारीचा सह-वासच अधिक पवित्र असतो. मी तुमची सरदारी इभ्रत घालवितें म्हणतां ! पण केवळ जन्मगुणानं मिळालेल्या पदवीचा दिमाख मिरवावा अन् वाड-वडिलांनीं आयतं वाढून ठेवलेलं श्रीमंतीचं ताट व्यसनांत उधळावं या-पलीकडे आजच्या सरदारांची इभ्रत ती काय उरली आहे !

**हर०**—( विठ्ठलपंतास एकीकडे ) एवंच काय, या नव्या युगांत सगळे आईबाप दुःखी ! नानासाहेबांच्या गळ्यांत माळ घालायला ताईसाहेब तयार नाहींत म्हणून यजमान दुःखी, कारकुनाऐवजीं गवयावर तुझी पोर फिदा म्हणून तूं दुःखी, अन् माझ्या पोरीला वाटचा चोरसुद्धां पतकरीत नाहीं म्हणून मी दुःखी ! या उगवत्या युगाला पितृपीडायुग असंच नांव शास्त्रकार देतील.

[ निमंत्रित सरदारांपैकीं एकजण प्रवेश करतो ]

**सरदार०**—तात्यासाहेब, हें चाललं आहे काय ! तिकडे मंडळी ताट-कळून गेली आहेत. नानासाहेब संतापले आहेत. आणखी उशीर झाला तर ते उठूनसुद्धां जातील. [ विश्वासराव प्रवेश करतो ]

**विश्वास०**—( कान्तेस ) लवकर चला. सभेची अगदीं वेळ झाली. आपल्याला आणखी उशीर झाला तर रविकान्तच इकडे येतील.

**कान्ता०**—तुम्ही व्हा पुढें. आलेंच मी. (विश्वासराव जातो). चल, तारे चल.

**वहिनी०**—ताई, माझं ऐक. हा अविचार सोड. पुरुषांच्या मर्जी-विरुद्ध वागणं आपला धर्म नव्हे.

**कान्ता०**—आई, तुझ्या पतिभक्तीला करावे तेवढे प्रणाम थोडेच होतील. पण आई, अंगीं योग्यता नसतांना प्रेम पायावर लोळतं म्हणूनच पुरुषांचे पाय भलत्या मार्गाला लागतात. आर्य स्त्री म्हटली कीं व्यसनकूपांत पिचणाऱ्या नवऱ्याचीही तिनं सेवाच केली पाहिजे या कल्पनेमुळंच आमच्या समाजाचा घात झाला आहे. पण नव्या युगा-न्तरांत असल्या सगळ्या कल्पना नष्ट झाल्या पाहिजेत. ( सभेच्या बाजूनें जयघोष ऐकूं येतो. ) युगान्तराचा हा जयध्वनि ऐकलास ! हा ऐक, अन् सरदारी कुळाची काल्पनिक इभ्रत राखायसाठीं मीं तात्यांचं म्हणणं ऐकावं असा आग्रह मला करूं नकोस.

**तात्या०**—आग्रहासारखा सामोपचार कशाला हवा ! नव्या शिक्ष-णानं शेफारलेल्या तुम्ही मुली बऱ्या बोलानं स्वैरवृत्ति टाकणार नाहीं. तुम्हांला—

**हर०**—( पडद्यांत पाहून चपापून ) साहेब आले !

**विठ्ठल०**—( तसेंच करून ) साहेब आले !

**नाना०**—( प्रवेश करून ) तात्यासाहेब, समजलं आम्हांला सारं. राहूं द्या आजचा समारंभ. आम्ही जातों आतां. मात्र, असली पुंडाई करणं तुमच्या मुलीला सोपं वाटत असलं तर तिला तेवढं बजावून सांगा, कीं शेवटीं माझ्याच गळ्यांत माळ घालणं तिला भाग पडेल.

**विठ्ठल०**—( हरभटास ) कुठल्या थराला गोष्टी चालल्या या पोरीच्या हट्टानं !

**हर०**—( विठ्ठलपंतास ) अरे बाबा, अलीकडे हें शिक्षण अन् स्वातंत्र्य बोकाळलं आहे ना ! त्याचे परिणाम असेच व्हायचे. "न स्त्री स्वातंत्र्यमर्हति।"

असं ठणठणीत वचन आहे ना. वेदांच्या आधारावांचून नाहीं बोलायचे आम्ही !

**तात्या०**—( नानासाहेबांस आर्जवानें ) आपण शान्त व्हावं. ( कान्तेकडे वळून ) कान्ते, तुझ्या पोरकटपणाचे परिणाम तुला कसे कळत नाहींत ! साहेबांच्या हातीं केवढी अमर्याद सत्ता आहे तुला समजत नाहीं ! त्या सत्तेच्या एका प्रहारानं रविकान्त नामशेष होईल. इतकंच नाहीं तर, विचार कर, साहेबांचा कोप झाला तर आपल्या कुळाची सरदारी इभ्रत संपून आपल्या पिढीजाद श्रीमंतीचं नांवही शिल्लक राहणार नाहीं.

**कान्ता०**—मग त्यांत काय बिघडलं ? दुराचाराच्या भुंग्यांनीं आंतून पोखरल्यामुळं सरदारी श्रीमंतीच्या इमारती नेहमींच कोसळायला टेकलेल्या असतात. त्या जमीनदोस्त झाल्या तर त्यांत समाजाचं कल्याणच आहे असं मी मानतें.

[ सभेंत जयघोष झालेला खिडकीच्या बाजूनें पुन्हां ऐकूं येतो. तारा खिडकींत असते ती कान्तेजवळ येते. ]

**तारा०**—चल बाई लवकर. नाहीं तर आतां रविकान्तच येतील बोलवायला.

**कान्ता०**—खरंच. चल.

**तात्या०**—कृतघ्न कारटे, कुळाचा सर्वनाश डोळ्यांनीं पहात प्रेमाचा पांचटपणा करायची तुझी तयारी आहे तर. मलाही अखेरचा इलाज केलाच पाहिजे. ( पुढें होऊन ) तुला अशी हात धरून खेंचून—

**कान्ता०**—( गंभीर व हुकमी आवाजानें ) तात्या ! ( तात्यासाहेब चपापतात व हात मागें घेतात. ) मागं व्हा.

[ रविकान्त प्रवेश करतो व हंसत कान्तेजवळ जाऊन तिचे हात आपल्या हातांत घेतो. ]

**रवि०**—किती बोलावणीं धाडायचीं !

**कान्ता०**—राग आला ?

**रवि०**—छे छे ! पण आटप आतां.

**कान्ता०**—चलायचंच.

**तात्या०**—कारटे, जा. चालती हो. काळं कर. पण लक्षांत ठेव, सत्तेचं बळ आमच्या बाजूचं आहे. तुझं अन् या भिकारड्याचं लग्न आम्ही कधींही होऊं देणार नाहीं.

**रवि०**—सरदारसाहेब, मीही बजावतों कीं आमच्या विवाहाच्या आड कोणतीही सत्ता आली तरी तिला कापून काढण्याचं सामर्थ्य माझ्या बाहूंत आहे.

**पद** ( शंकरा; तिताल )

**रुचिर प्रिय लता ही भयभीता । जरि निकटिं आली ।**
**हा भुजदंडचि शोभे आसरा ॥ ध्रु० ॥ जरि मदान्ध कुणि ।**
**करिल विरोधा । दलन करिल झणि । बाहु हा ॥ १ ॥**

[ रविकान्त व कान्ता हातांत हात घालून जातात. त्यांच्या मागोमाग ताराही जाते. ]

**तात्या०**—( नानासाहेबांस ) आपली क्षमा मागण्यापेक्षां आपण आतां आपल्या सत्तेच्या बळावर माझ्या मुलीला पदरांत घ्या अशी याचना करणंच मला या वेळीं उचित वाटतं.

**नाना०**—तुम्ही निश्चित रहा. रविकान्त उद्यां कायमचा वाटेवेगळा होईल. ( जाऊं लागतो. )

[ पडदा पडतो. ]



# अंक चवथा



## प्रवेश १ ला

[ अंधेरी रात्र. रविकान्ताच्या घरामागील रस्ता. चोरटेपणानें दब-कत चालत व सरगम घोकीत पंचम प्रवेश करतो ]

**पंचम०**—( एक फेरी घालून ) इथं कुठं आहे विठ्ठलपंत ! याच वेळीं अन् रविकान्ताच्या घराच्या पिछाडीला याच जागीं त्यानं मला भेटायला तर सांगितलं. मग हा अजून कसा आला नाहीं ! गवई आला तरी ऐकणाऱ्यांचा पत्ता नसायचा हें आम्हां गवयांचं ठरलेलंच नशीब आहे म्हणा. बाकी मी आपल्याच नशीबाला नांवं कां ठेवूं ! जो विठ्ठलपंत मला सावलीलाही उभं राहूं देत नसे त्यानं आपण होऊन म्हणावं कीं पंचमा तूं माझं एक काम केलंस तर माझी कोकिला मी तुला देईन. यापेक्षां नशीबानं आणखी सम ती काय अकल्पित साधायची ! घुम्या श्रोत्यानं वाहवा द्यावी तद्वत् विठ्ठलपंतानं आपण होऊन कोकिला द्यायचं बोलणं करावं हें आश्चर्य आहे. पण हा विठ्ठलपंत मला कसलं काम सांगणार आहे तें नीट स्पष्ट विचारून न घेतां तो सांगेल तें करायचं कबूल केलं हें जरासं चुकलंच कीं काय कोणास ठाऊक !—पण आतां ही फिकिर करून काय उपयोग ! एकदां तोंडांतून गेलेली तान बेसूर असली तरी परत थोडीच येणार ! ( पडद्यांत पाहून ) ही गाडी थांबली, अन् त्यांतून हा विठ्ठलपंतच उतरला वाटतं.

[ विठ्ठलपंत प्रवेश करतो ]

या विठ्ठलपंत, तुमची वाट पाहतां पाहतां कमसुरांतल्या तंबोऱ्याच्या तारांप्रमाणं माझ्या पायांच्या नाड्या ढिल्या झाल्या कीं.

**विठ्ठल०**—स् ! गाढवा, हळूं बोल. कोणी आपल्याला पाहिलं किंवा आपलं बोलणं ऐकलं तर तुझ्या नाड्या पुऱ्या आंखडायची मात्र वेळ येईल.

**पंचम०**—म्हणजे ? मला जें सांगणार आहांत तें कांहीं काळं बेरं आहे कीं काय ? तसं असेल तर—

**विठ्ठल०**—सुः ! प्रथम तूं आपला आवाज हलका कर पाहूं. कसलं काळं अन् पांढरं घेऊन बसला आहेस ! तुला कोकिला हवी कीं नको ?

**पंचम०**—हवी, हवी ! पण हें तुमचं हलकं बोलणं, ही रात्र, अन् हा अंधेर यांनीं मी जरा गांगरलों आहें. आम्हां गवयांचीं रणक्षेत्रं म्हणजे रोषनाईच्या झगझगाटांतले प्रशस्त महालच असायचे. त्यामुळं असल्या अंधेऱ्या अडचणींत तुम्ही मला आणल्यानं मी जरा सरदून गेलों आहें.

**विठ्ठल०**—बरं, सरदलास तरी शिंकूं नकोस. नाहीं तर आपल्या कामाला अपशकून व्हायचा. अन् आतां वेळ घालवूं नकोस.

**पंचम०**—काय करूं ?

**विठ्ठल०**—सांगतों. ( आंत जातो व उभ्या असलेल्या गाडींतून एक पेटी आणतो. ) ही पेटी घे.

**पंचम०**—या पेटींत काय आहे हो ?

**विठ्ठल०**—तुला काय करायचं आहे ?

**पंचम०**—तसं नाहीं. मागच्या त्या साहसाच्या वेळीं शास्त्रीबुवांनीं आपली चिमी बुरख्यांत ठेवून माझ्या प्राणांवर प्रसंग आणला होता. त्यामुळं तुम्हीही या पेटींत एखादी छोटी कैदाशीण ठेविली आहे कीं काय अशी शंका येते.

**विठ्ठल०**—( स्वगत ) दारू म्हणजे कैदाशीण या अर्थीं याची शंका खरीच ठरेल. या पेट्या रविकान्ताच्या घरांत टाकायचं हें साहेबांचं कारस्थान मी आशा रीतीनं पार पाडतों आहे हें चुकत तर नाहीं ! मी स्वतःच जाऊन या पेट्या—नाहीं, त्यांतच भीति आहे. त्यापेक्षां रविकान्ताच्या घरीं या आचरटाची जा ये असल्यामुळं याच्या हातून पेट्या टाकणंच बरोबर. ( उघड ) मूर्खच आहेस. हं, धर ही पेटी. भितोस काय ? कां नको आहे कोकिला तुला !

**पंचम०**—नाहीं, नाहीं. घेतों पेटी. अरेच्या ! जड आहे कीं बरीच ! बरं, काय करायचं हिचं !

**विठ्ठल॰**---तुला रविकान्ताच्या घराची पुरी माहिती आहे ना?

**पंचम॰**---हो. ताईसाहेबांच्या बरोबर मी कितीकदां गेलों आहें तिथं.

**विठ्ठल॰**---ठीक. हें बघ, (त्याच्या कानांत बरेंचसें सांगून) समजलास?---अन् आज हें करणं अवघड नाहीं. रविकान्ताच्या आईची तब्येत आज फार बिघडली आहे म्हणे. सगळीं शुश्रुषेंत असतील. अं? लवकर ये. आणखी असल्या दोन पेट्या नेऊन टाकायच्या आहेत.

**पंचम॰**---अहो पण भरलं आहे तरी काय यांत?

**विठ्ठल॰**---आचरटा, तुझं भाग्य. कोकिला हवी असेल तर येवढं काम तुला उत्तम केलं पाहिजे. हं, जातोस कीं नाहीं?

**पंचम॰**---जातों. पण मी परत येईपर्यंत तुम्ही इथंच असाल ना?

**विठ्ठल॰**---हो, त्या गाडीपाशीं उभा आहें बघ. हं, आटप. (तो जाऊं लागल्यावर) पण ए, परत ये. अरे असा हा तंबोरा असाच गळ्यांत ठेवून का तूं जाणार! म्हणजे साग्रसंगीत पकडला जायला कांहीं वेळ नको! आचरट. काढ तो तंबोरा. दे माझ्याजवळ. घुटमळतो आहेस काय? आटप.

**पंचम॰**---अहो, हें एक सोडून काय वाटेल तें सांगा. सुवासिनीला गळ्यांतलं मंगळसूत्र नसेल इतका हा गळ्यांतला तंबोरा---

**विठ्ठल॰**---तुझ्या आचरटपणानं आयत्या वेळीं गळा धरायची वेळ आणली खरी. पण सुवासिनींच्या गळ्यांतही हात टाकण्यांत निर्ढावलेले आम्ही उन्मत्तांचे आश्रित तुझ्या गळ्यांतला तंबोरा तोडायला भिणार? (बळजोरीनें त्याच्या गळ्यांतला तंबोरा काढूं लागतो.)

**पंचम॰**---धांवा! कुणी तरी धांवा! एका अनाथ गवयाच्या संगीत सौभाग्यावर हा विठ्ठल---

**विठ्ठल॰**---(त्याचें तोंड दाबून तंबोरा काढून घेऊन खिशांतील पिस्तुल काढून दाखवीत) आतां तुझ्या आचरटपणावर हीच मात्रा द्यावी लागेल. मुकाट्यानं जातोस कीं नाहीं?

**पंचम॰**---जातों, जातों. पण तुम्ही माझा तंबोरा काढून घेतलात हें बरं नाहीं केलंत. डोक्यांतला मणि गेला कीं नागाला जसं वाटावं---

**विठ्ठल**०—आतां तूं पाय उचलतोस कीं--( पिस्तुल रोखतो. )

**पंचम**०—जातों. चाललोंच. पण मी येईपर्यंत माझ्या तंबोऱ्याच नीट सांभाळ करा हं—( हुंदका देतो. )

**विठ्ठल**०--आचरट ! नीच. अन् हें बघ, या पिस्तुलाची ही जीभ नीट पाहून ठेव. म्हणजे या प्रकाराची वाच्यता तुझ्या जिभेकडून व्हायची नाहीं. जा. मी त्या गार्डीत तुझी वाट पाहतों. ( पंचम जातो. ) आतां उद्यांपासून ठेवतों कोकिलेला घरांत कोंडून अन् हें खुळं मागणी करायला आलं तर करतों अर्धचंद्रानं संभावना. गरज सरो अन् गवई मरो.

( जातो. )

[ पडदा वर जातो ]

---

## प्रवेश २ रा

[ रविकान्ताच्या घरांतील दालन. एका टेबलावर बरेचसे
कागद व पुस्तकें पडलीं आहेत. रविकान्त
लिहीत बसला आहे ]

**रवि**०—( लिहितां लिहितां मध्येंच थांबून व विचार करून ) एखादं महत्त्वाचं कार्य करणाऱ्या माणसानं स्त्रीप्रेमापासून दूर रहावं असं कां म्हणतात कोण जाणे ! मनुष्य प्रेमशृंखलेनं बद्ध झाला कीं कर्तव्याच्या मार्गावरचीं त्याचीं पावलं मंदावतात असं कां समजतात कोणास ठाऊक ! माझा अनुभव अगदीं उलट आहे. प्रेमामुळं मनुष्याची कर्तव्यनिष्ठा वाढते. कार्यनिष्ठेचं फूल ज्या प्रेमामुळं कुसकरलं जातं तें खरं प्रेमच नव्हे. तो विषयविकाराचा झंझावात होय. खरं प्रेम मंदवायुलहरीसारखं असतं. कार्यनिष्ठेची कलिका त्या प्रेमामुळं उमललीच पाहिजे. दुसऱ्याचं हृदय आपल्या ताब्यांत यावं यासाठीं आपलं हृदय दुसऱ्याच्या ताब्यांत द्यायची अनावर म्हणजेच प्रेम. अन् असं असेल तर आपल्या प्रेमाच्या माणसाच्या



रविकांतः—हें कोण ?...कांता !

[ पृष्ठ ७३

दृष्टीनं आपली योग्यता वाढावी यासाठीं प्रेमी मनुष्य आपलं अंगीकृत कार्य ः ाढत्या तत्परतेनंच करीत राहील. कारण, आदराच्या उंच वृक्षावरच प्रेमलता नेहमीं वाढते.

**पद** ( बागेश्री; तिताल )

**प्रणयवेलि मधुरा जी साजिरी ।**
**सद्गुणतरुला वरुनी ती राही ॥ ध्रु०॥**
**पुलकित होतां आदरसुजलें ।**
**कुसुमित व्हावी कामलता ती ॥ १ ॥**

कान्तेविषयींच्या प्रेमानं मला कार्यविन्मुख कधींच केलं नाहीं. स्त्रीप्रेमामुळं माणसाची कर्तव्यावरची दृष्टि अधिक दृढ अन् निर्भयच झाली पाहिजे. हं ! प्रेमानं कार्यकर्त्या माणसाची दृष्टि अंध होते असं कोण म्हणत असतील ते म्हणोत !

[ कान्ता प्रवेश करते. रविकान्ताची पाठ दाराकडे असल्यामुळें व तो आपल्या विचारांत गढलेला असल्यामुळें ती आल्याचें त्याच्या लक्षांत येत नाहीं. रविकान्तानें आपल्याला पाहिलें नाहीं तेव्हां थोडा विनोद करण्याच्या बुद्धीनें कान्ता त्याच्यामागें हळूच जाऊन त्याचे डोळे झांकते. ]

**रवि०**—हें कोण ! ( ओळखून )हं, कान्ता ! वा ! प्रेमानं माणसाची दृष्टि अंध होते असं म्हणणाऱ्या माणसांना मी मनाशीं खोटं ठरवीत होतों तोंच माझ्या प्रेमानं मला अंध केलं ! कान्ते, चांगलं का हें !

**कान्ता०**—( डोळे सोडून व त्याच्यासमोर उभें राहून ) पण कार्यकर्ती माणसं आधींच इतकीं आंधळीं असतात कीं कुणी त्यांना आपलं जीवसर्वस्व अर्पण केलं तरी तें त्यांना दिसत नाहीं ! मग प्रेम त्यांना अधिक आंधळं तें काय करणार !

**रवि०**—अस्सं ! हा मला टोमणा आहे वाटतं !

**कान्ता०**—उलट, कार्यकर्ते पुरुष आपल्या गुणांच्या नजरबंदीनं दुसऱ्याला मात्र आंधळं करून टाकतात.

**रवि०**—आपल्या नाजूक हातांनीं जसे माझे डोळे मघांशीं बंद केलेस तसं अशा मधुर भाषणानं माझं तोंड आतां बंद करणार आहेस वाटतं ' किती मोहक तुझं भाषण. तुझ्या ओंठांतून बाहेर पडणारे कटु शब्दही गोडच लागतात. तुझ्या ओष्ठांचं माधुर्य अप्रत्यक्ष रीतीनं चाखतां यावं म्हणून सारखं तुझंच बोलणं ऐकत जन्माचं मुक्याचं व्रत पत्करावंसं वाटेल, अन् नेत्रांना तुझ्या कोमल करपाशाचा आनंद सतत मिळावा म्हणून तुझ्या हातीं जन्माचं अंधत्व स्वीकारावंसं वाटेल. झांक, पुन्हां झांक माझे डोळे.

**कान्ता०**—छे ! छे ! मघांशीं मीं आपले डोळे झांकले हें अगदीं वावगं झालं माझ्या हातून. आपले डोळे क्षणभर विनोदासाठीं झांकणंसुद्धां शोभायचं नाहीं मला. खरा मोठेपणा कोणता तें ओळखण्याची दृष्टि ज्यांच्यामुळं मला आली त्यांची दृष्टि मीं झांकायची का ?

**पद** ( जयजयवन्ती; झपताल )

**नयनकमलांवर पटल पसरीलें**
**अवगणुनि उपकार सारे आपुले ॥ ध्रु० ॥**
**शिकविलें आपणचि मज सुगुणकृत जी**
**तीच महती मान्य, नवबोधा पाजिलें ॥ १ ॥**

माझ्या मघांच्या अविचाराबद्दल क्षमा असावी हो. पण आपले डोळे झांकण्याचा मोह मला व्हावा असं आपण केलं नसतं म्हणजे—

**रवि०**—शाबास ! काय केलं मीं ?

**कान्ता०**—काकू फार आजारी म्हणून काल रात्रभर त्यांच्या उशागतीं बसून जाग्रण केलं. आतां घटकाभर झोंप घ्यायची तें हा कामाचा पसारा मांडून बसायचं काय कारण होतं ?

**रवि०**—काल रात्रीं बसल्या बसल्या कांहीं रसायनांच्या विशिष्ट मिश्रणांचं गणित सुचलं तें तसंच डोक्यांत घोळत होतं म्हणून आत्तां तें कागदावर मांडून पडताळून पहात होतों.

**कान्ता०**—शर्थ आहे बाई ! इतक्या व्यग्रतेंतसुद्धां असलीं क्लिष्ट गणितं डोक्यांत चाललेलींच असतात ना !

**रवि०**—तुझ्या प्रेमाच्या पूर्णांकाचा आधार आहे म्हणूनच ही मला आंकडे गोड सुखाची वाटते. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून तर मला असं वाटाय... लागलं आहे कीं असामान्य शोधकांचे सारे शोध स्त्रीप्रेमाच्या स्फूर्तीमुळंच जगाच्या पदरांत पडले असले पाहिजेत.

**पद** ( वसंत; एकताल )

**नरमति सुफला ललना करि निजहार्तीं। काव्यशास्त्र दिव्य शोध येती उदयाचलासि। धन्य धन्य होय लोक ॥ ध्रु० ॥ रमणिहसितचंद्रिका। अंबुजां गुणांच्या। फुलवि, होइ सुभग जगत ॥ १ ॥**

**कान्ता०**—पण स्त्रियांचं अंतःकरण अंकित करण्यासारखे गुण पुरुषांच्या ठायीं असतात म्हणूनच स्त्रीप्रेमाचा उगम होतो ना! आपल्याच जलगुणानं आकाशांत मेघमाला उत्पन्न करून मग तिच्या जलधारांत प्रेमाचा आनंद उपभोगणाऱ्या सागराशीं पुरुषांची तुलना करावीशी मला वाटते.

**पद** ( मालकंस; तिताल )

**सदा करुनि वश मना रमणिच्या**
**सेवित नर प्रणया ॥ ध्रु० ॥**
**जेंवि उदधि जलदां जलभारें**
**पोषि, फिरुनि शतधारांस सेवी ॥ १ ॥**

मी म्हणतें तें खोटं का?

**रवि०**—आतां तुझं तोंड असं झांकल्याखेरीज हा गोड वाद संपायचा नाहीं.

**कान्ता०**—इश्श! हें काय!—[ आंतून "कान्ते! अग कान्ते! चहा निवून चालला!" अशी तारा हांक मारते. ] अगबाई! खरंच! चहा तयार होतांच तो घेऊन तारेनं काकूंच्या खोलींत जायचं ठरलं अन् चहा तयार झाला म्हणून सांगायला मी इकडे आलें. आपण बोलायला

सुरवात करून मला तें सारं विसरायला लावलं बरं का! आतां लवकर गेलं पाहिजे अं! नाहीं तर तारेची चेष्टेखोर जीभ आहे ती!

**तारा**०--( प्रवेश करून ) वा! किती ग वाट पाह्यची? .ा तयार झाला, येवढा तीन शब्दांचा निरोप सांगायला इतका वेळ लागतो का? यांनीं तुला पुरी वेडी केली खरी. एखादं राज्य माझ्या हातीं असतं तर दुसऱ्या कशापेक्षां तरुण मुलींना वेड लावण्याच्या आरोपावरून मीं रविकान्तांना आधीं पकडलं असतं.

[ एक इन्स्पेक्टर व कांहीं शिपाई प्रवेश करतात ]

**इन्स्पे**०--रविकान्ताला पकडायसाठीं आम्ही आलों आहोंत. कुठं आहे रविकान्त?—

[ नानासाहेब प्रवेश करतात. शिपाई व इन्स्पेक्टर त्यांना सलामी देतात. रविकान्त जागचा हालतही नाहीं. व त्या प्रकारानें आपल्याला आश्चर्य वाटलें आहे किंवा राग आला आहे असेंही दखावीत नाहीं. एक शिपाई पुढें होऊन एक खुर्ची मांडतो तिच्यावर नानासाहेब बसतात ]

**इन्स्पे**०--रविकान्त, तुला पकडायचं वॉरंट आमच्याजवळ आहे. ( कागद पुढें करतो. )

**रवि**०--( कागदाकडे पाहिलें न पाहिलेंसें करून ) कसला आरोप आहे माझ्यावर?

**इन्स्पे**०—तुझी रसायनांची प्रयोगशाळा म्हणजे निव्वळ लबाडी असून त्या जागीं तूं चोरून दारू गाळतोस असा तुझ्यावर आरोप आहे.

**रवि**०—काय, म्हणतां काय?

**तारा**०--ठीक, ठीक. जे रविकान्त दारूबंदीच्या चळवळीचे पुढारी त्यांच्यावर चोरून दारू गाळण्याचा आरोप! मग सरोवरांतलीं कमळं भाजून करपविल्याच्या आरोपावरून चंद्राला, अन् अंधेराचा कारखाना चोरून चालविण्याच्या आरोपावरून सूर्याला कां नाहीं पकडीत हो?

**इन्स्पे**०—पोरी, तुझ्या चंद्रसूर्याच्या गोष्टी बस्स कर. ज्यांच्या ओंठावर दारूबंदीचीं व्याख्यानं नाचतात अशा कितीक पुढाऱ्यांच्या पोटांत दारूचं

ओघळ ।ब्रहात असतात हें तुझ्या पोरबुद्धीला काय माहीत ! ( नानासाहेब हंसतात ) रविकान्त माझ्याजवळ दोन वॉरंटं आहेत. एकानं मी तुला पकडतों ; न् दुसऱ्यानं मला तुझ्या प्रयोगशाळेची झडती घ्यायची आहे.

( दुसरा कागद दाखवितो. )

**रवि०**—( हंसत ) ठीक आहे. मला पकडायला आलांत तर मी तुमच्या स्वाधीन आहें. अन् झडती घ्यावयची तर तीही घ्या. तुम्हांला तिथें काय सांपडणार कुणास ठाऊक.

**इन्स्पे०**—हंः ! गोगलगाय अन् पोटांत पाय. पण अशानं आम्ही फसणार नाहीं. चल आम्हांला घेऊन तुझ्या प्रयोगशाळेंत.

[ रविकान्त, इन्स्पेक्टर व शिपाई जातात. ]

**नाना०**—( कान्ता व तारा यांच्याकडे पाहून ) काय, ठीक आहे ना !

**तारा०**—आपलं दर्शन झालं नव्हतं तोंपर्यंत ठीक होतं.

**नाना०**—मीं कान्तेला विचारलं होतं. मधेंच बोलण्याचे श्रम व्यर्थ घेतलेत.

**तारा०**—आपल्या या नव्या पराक्रमानं आपण तिला इतकी हतबुद्ध केली आहे कीं तिला बोलतांसुद्धां यायचं नाहीं. रविकान्तासारख्या सोज्वळ माणसावर असलीं अरिष्टं—

**नाना०**—सोज्वळ ! हंः ! तुम्ही भ्रमांत आहांत. रविकान्ताचं खरं स्वरूप तुम्हांला माहीत नाहीं. तें जगाला स्पष्ट दिसावं म्हणूनच हे झडतीचे हुकूम मला सोडावे लागले. लवकरच त्याचा खरा चेहरा लोकांना दिसेल.

**तारा०**—लोकांचे चेहरे दाखविण्यासाठीं आरसा सज्ज करणाऱ्या माणसाला हें कळत नाहीं कीं त्यांत आपलीच हिडिस चेहरेपट्टी आधीं दिसण्याचा संभव आहे.

**नाना०**—( संतापानें ) हंः !—

[ तीन शिपाई एकेक पेटी आणून नानासाहेबांसमोर ठेवतात. चवथा शिपाई रसायनांच्या बाटल्या, कांचेच्या नळ्या, कांचेचे फुगे वगैरेंनीं भरलेला एक हारा आणून ठेवतो. इन्स्पेक्टर विजयी मुद्रेनें प्रवेश करतो. मागून रविकान्त येतो. ]

**रवि०**—( कान्ता व तारा यांच्याजवळ जाऊन ) नीचांनीं सफाईनं कारस्थान रचलेलं दिसतं. त्या पेट्यांत खरोखरच दारूच्या बाटल्या आहेत. त्या इथं कशा आल्या देव जाणे !

**इन्स्पे०**—साहेब, या पेट्या सांपडल्या. दारूच्या बाटल्यांनीं भरलेल्या आहेत. दारू गाळायची सामुग्री असावी अशा संशयानं या बाटल्या अन् कांचसामानही जप्त केलं आहे.

**नाना०**—वा रविकान्त, चांगलं मांडलं होतंस: प्रयोगशाळेचं नाटक. आतां यापुढं तुरुंगाची खोली हीच तुझी प्रयोगशाळा, अन् तिथल्या चिलटापिसवांची मोजदाद हेच तुझे शोध !

**रवि०**—पण माझा अपराध तर सिद्ध होऊं द्या, मग बोला तुरुंगाच्या गोष्टी.

**नाना०**—हा भाराभर प्रत्यक्ष पुरावा असल्यावर तुझ्यांत अन् तुरुंगाच्या खोलींत अंतर तें किती !

**रवि०**—( स्वगत ) अरे नीचा.

**नाना०**—कां पुढारी, या पुराव्यावर आपलं काय उत्तर आहे ! बोला कीं.

**रवि०**—उत्तर येवढंच कीं वेळ येईल तेव्हां माझं उत्तर तुम्हांला मिळेल. इथं आतां वाद नको. माझी आई फार आजारी आहे. तुम्हांला मला पकडायचं आहे तर निमूटपणं काय तें करा. मला पकडून नेत आहांत तें तिला कळलं तर—( कंठ दाटून आल्यामुळें त्याला पुढें बोलवत नाहीं. )

**कान्ता०**—( पुढें होऊन इन्स्पेक्टरास ) माझी एक विनंति आहे. रविकान्त तुमच्या स्वाधीन होतील याविषयीं तुम्हांला शंका नको. पण त्यांची आई आज तीन दिवस अत्यवस्थ आहे. यानंतर त्यांची यांची पुन्हां केव्हां भेट होईल देवाला माहीत. म्हणून इथून जाण्यापूर्वी आईची थोडा वेळ भेट घेण्याची परवानगी रविकान्तांना द्या.

**इन्स्पे०**—अशा परवानगीचा हक्क रविकान्ताला नाहीं.

**कान्ता०**—हा हक्काचा किंवा कांटेकोर कायद्याचा प्रश्नच नाहीं. साध्या माणुसकीची ही बाब आहे.

**इन्स्पे०**—पण पकडलेला वहिमी इसम माणूस नसतो. त्याला माणुसकीचा हक्क सांगायचा झाला तरी जामीन द्यावा लागतो.

**कान्ता०**—तुमच्या अंगीं माणुसकी असती तर तीच जामिनकीच्या जिभेनं तुमच्याशीं बोलली असती. हे माझे सगळे दागिने जामिनादाखल घ्या. वाटलं तर मला ओलीस धरा. पण रविकान्तांना आईची भेट घ्यायची परवानगी द्या.

[ इन्स्पेक्टर नानासाहेबांकडे पाहतो. ]

**नाना०**—( क्रुद्ध मुद्रेनें नकारार्थी मान हालवून इन्स्पेक्टरास ) आटपा, उचला पाऊल.

**इन्स्पे०**—( कान्तेस ) तुमचं म्हणणं मान्य करतां येत नाहीं. आमची डयूटी आम्हांला रोखठोक बजावली पाहिजे.

**तारा०**—हो ! नाहीं तर हें राज्यच काय, उभी पृथ्वी कोसळेल ! रविकान्तांनीं पांच मिनिटं आईची भेट घेतली कीं या आनंदपूरच्या राज्यावर काय भयंकर संकटं गुदरतील याची कान्ते, तुझ्या माझ्यासारख्या वेड्या माणसांना कुठली कल्पना ? तीं संकटं टाळण्यासाठीं तर असे शहाणे हपीसर दाम खातात ! तें कांहीं नाहीं, इन्स्पेक्टरसाहेब, रविकान्तांना आपल्या अत्यवस्थ आईची भेट घेऊं न देणं हीच तुमची डयूटी !

**एक शिपाई०**—( दुसऱ्यास ) कोण रे ही त्राटिका ?

**दुसरा०**—अशी अवा हवी होती तुला म्हणजे कसा रोज झिंगून घरीं गेला असतास पाहिलं असतं.

**इन्स्पे०**—( तारेस ) खुशाल चरफडा आमच्या नांवानं. रविकान्त, उचल पाय.

**कान्ता०**—हें कोणाचं नीच कारस्थान आहे हें आम्ही पुरतेपणीं जाणून आहोंत. पण त्या कारस्थानावर केवळ कसाबालाच शोभेल अशा निर्दयतेचा कळस चढविला नसतात तरी चाललं असतं. सूड घ्या; पण तो घेतांना खाटकाचंच अवसान आणलं पाहिजे कीं काय ? अत्यवस्थ

आईला न भेटतां तुमच्या स्वाधीन होतांना रविकान्तांच्या हृदयाल केवढा पीळ पडत असेल याची तुम्हांला कल्पना कशी होत नाहीं ? तुमच्या आईनं लहानपणीं तुम्हांला हृदयाच्या उबेंत कधीं घट्ट धरलं न : का ? अनन्य प्रेमानं तुम्ही आईच्या गळ्याला कधीं मिठी मारली नव्हती का ? मायेच्या पदराखालीं तान्हुल्याला झांकून त्याच्याशीं मुक्याचा संवाद करणाऱ्या आईचा रोमांचकारी स्पर्श तुम्हांला कधीं झाला नव्हता का !

**रवि०**––( तिच्याजवळ जाऊन ) उगीच काय बरं संताप करून घ्यावा ! माझ्या नशिबांत असेल तर आईच्या प्रकृतीला आराम वाटेल अन् तिची माझी पुन्हां भेट होईल. नाहीं तर–( आईच्या खोलीकडे पाहत ) आई, तुझे आशीर्वाद माझ्या मस्तकावर असोत म्हणजे असल्या संकटांचीं खड्गं सहज भंगून जातील. जाऊं दे मला. संताप आंवरून धर. आईला संभाळा अन् दोघी मिळून माझं कार्य माझ्या मागं चालू ठेवा, म्हणजे जगाची खात्री पटेल, कीं युगान्तर घडवून आणण्याच्या योग्यतेच्या तुम्ही दोघी आहांत.

**नाना०**––नसतीं बोलणीं काढून आपल्या भेकडपणावर पांघरूण छान घालतो आहेस ! मागच्या उठाठेवी तुला कशाला ? आटप, पुढें हो.

**रवि०**––मी मागं नाहीं, पुढेंच आहे. ( तारेस ) आपला चहा मात्र शेवटीं तसाच राहिला, नाहीं !

**तारा०**––या लोकोत्तर धीर वृत्तीनं तुमची साऱ्या जगांस चहा झाल्यावर या चहाची काय प्रतिष्ठा !

[ कान्ता व तारा यांखेरीज सर्वजण जातात. ]

[ पडदा पडतो ]






**नाना:**—आतां तुरुंगाची खोली हीच तुझी प्रयोगशाळा अन् चिलटांपिसवांची मोजदाद हेच तुझे शोध.

[ पृष्ठ ७८

# अंक पांचवा



## प्रवेश १ ला

[ नानासाहेबांची खोली. ते व तात्यासाहेब दारू घेत घेत बोलत बसले आहेत. ]

**नाना०**—तुम्ही भारीच भित्रे बुवा तात्यासाहेब.

**तात्या०**—तुम्ही म्हणणारच मला. पण कान्ता अन् तारा ज्या तऱ्हेनं घरांत वागताहेत तिचा रोज अनुभव घ्यायची पाळी माझ्यासारखीच तुमच्यावर आली असती म्हणजे माझ्यासारखंच म्हटलं असतंत तुम्ही. एक तर सभेवांचून त्यांचा एक दिवससुद्धां सुना जात नाहीं,—

**नाना०**—हंः ! अहो, ही सभांची अन् भाषणांची टुरटुर किती दिवस चालेल त्यांची ! रविकान्ताची रीतसर चवकशी कोर्टांत उद्यां सुरू होईल. निकाल काय द्यायचा त्याची समज न्यायाधीशांना दिली गेलीच आहे. रविकान्ताच्या हातापायांत बेड्या ठोकल्या कीं दुसऱ्याच दिवशीं आमच्या लग्नाचा जंगी समारंभ ! ( ग्लास पिऊन खालीं ठेवीत ) या क्षणीं मी सत्तेच्या उन्मादाच्या ऐन शिखरावर आहें. उगीच नसत्या शंका काढून माझी या वेळची मजा कमी करूं नका. ( ग्लास पुन्हां तोंडाला लावतो. एक पट्टेवाला येतो. ) काय रे !

[ पट्टेवाला मुजरा करून एक तारेचा लखोटा देऊन जातो. लखोटा फोडून आंतील कागद वाचतांच नानासाहेब दचकतात व रागानें लखोट्याच्या पाकिटाचा चुरगळा करतात. ]

**तात्या०**—( एकदम ग्लास खालीं ठेवीत ) कुणाची तार ?

**नाना०**—( अर्धवट स्वतःशीं ) घात झाला ! भलत्या वेळेस भलती गोष्ट झाली !

**तात्या०**---कुणाची आहे तार!

**नाना०**---तार विलायतची आहे. वाईट बातमी आहे. श्रीमंतांच्या पोटाचं ऑपरेशन होत असतां त्यांचं प्राणोत्क्रमण झालं!

**तात्या०**---काय, म्हणतां काय!---

**नाना०**---पहा ना. (तारेचा कागद देतो.) (स्वगत) छे! हें अगदीं भलत्या वेळेस झालं! आतां युवराज गादीवर येणार!---युवराज!---म्हणजे आमच्या सत्तेची समाप्तिच म्हणायची!---मग रविकान्ताची बोळवण व्हायची कशी!---अन् आमचं लग्न! छे छे!---सारा डाव फसणार कीं काय!---पण असो. धीरसो गंभीर. नव्या श्रीमंतांचेही कान फुंकतां येतील. किती झालं तरी तो बच्चाच आहे! (उघड) चला, तात्यासाहेब, श्रीमंतांच्या देहावसानाची ही बातमी योग्य रीतीनं जाहीर केली पाहिजे.

[जाऊं लागतात.]

[पडदा]

---

## प्रवेश २ रा

[विठ्ठलपंताच्या घराची बाजू. पंचम सरगम घोकीत प्रवेश करतो.]

**पंचम०**---सारं शहर आनंदानं कसं फुललं आहे. युवराज गादीवर आले म्हणून साऱ्या प्रजेनं इतक्या मनापासून उत्सव कधींच केला नसेल. मैफलींत बदसुर गवई उठून त्याच्या जागीं सच्च्या सुराचा गवई बसतांच श्रोत्यांत रोषनाई यावी त्याप्रमाणें या आनंदपूरच्या राज्यांत आज तीन दिवस जिकडे तिकडे रोषनाई लागून राहिली आहे. बाकी सारे लोक आनंदांत असून मी मात्र कष्टीच! काय करावं! माझ्याकडून मतलब साधून घेतांच लुच्चा विठ्ठलपंतानं मोहरा फिरवला. बरं, साहसाचा पण जिंकला असं सांगून कोकिलेला वश करावी म्हटलं तर विठ्ठलपंतानं तिची माझी गांठ पडणं मुष्किल करून टाकलं आहे. खुशाल कोंडून

घातलं आहे बेल्यानं तिला घरांत! आपल्या घराण्यांतल्या चिजा कुजल्या तरी बेहेत्तर पण दुसऱ्याला न देणाऱ्या गवयाप्रमाणं हा विठ्ठलपंत पोटची चीज घरांत कोंडून कुजवायला तयार झाला आहे. आज तीन दिवस पाहतों आहें घराच्या पुढच्या दाराशीं या विठ्ठलपंताचं पहारेकरी वात्सल्य सारखं येरझारा घालतं आहे. शेवटीं आज या मागच्या बाजूनं तरी कोकिलेची दृष्टादृष्ट होईल अशा हेतूनं इकडे आलों. पण हाय! माझी कोकिला कुठें आहे?

[ पडदा वर जातो. माजघराच्या भिंतीची बाहेरची बाजू दिसते. त्या भिंतींतल्या एका खिडकीच्या गजांना डोकें टेकून कोकिला बाहेर पाहते. ]

**कोकिला०**—छे! या कसाबखान्यांतून मी आतां कसची सुटते? प्रत्यक्ष बापानंच घराचा कोंडवाडा केल्यावर आशेला जागा कुठली! हे बाप पोटच्या पोरींना समजतात तरी काय? गवसलेले गुलाम कीं गोठ्यांतल्या गाई? तें कांहीं नाहीं. कान्तातांईसाहेबांसारखं आपणही आतां उघड बंडच केलं पाहिजे. पण त्यांचे रविकान्त त्यांच्या साहाय्याला हरवखत धांवले तसे माझे पंचम—पंचम! कुठें आहांत तुम्ही!

**पंचम०**—( दचकून व कोकिलेला पाहातांच खिडकीजवळ जाऊन ) कोण! कोकिला! माझ्या हृदयांतली कोकिलाच कां या खिडकींत येऊन मला पाहते आहे?

**कोकिला०**—पंचम, मी तर तुम्हांला पाहतेंच आहें. पण तुम्ही मात्र आतां माझ्याकडे नुसतं पाहात न बसतां माझी सुटका करा. तुमच्या प्रेमाची या वेळीं कसोटी आहे.

**पंचम०**—ठीक आहे. या दुसऱ्याही कसोटीला आपली तयारी आहे. गवई एकदां मैफल मारायला बसल्यावर मग काय? एक चीज तिथें दोन चिजा! पण कोकिले, प्रथम मला हें सांगूं दे कीं तुझ्या पहिल्या कसोटींतून मी पार पडलों आहें. तुझा साहसाचा पण मीं पुरा केला आहे. तुझ्या पणासाठीं मीं साहस केलं. कोकिले—

**कोकिला०**—पण माझं ऐका. वेळ घालवूं नका. आधीं माझी इथून सुटका करा.

**पंचम०**—पण या खिडकींतून तुला सोडवूं कशी ? या तंबोऱ्याच्या घावानं खिडकी मोडीन म्हटलं तर त्यांत तंबोऱ्याचंच बरं वाईट व्हायचं. हे यःकश्चित् गज पण या क्षणीं मला गजांसारखे भासत आहेत. अरेरे ! गवयाच्या हातचं हत्यार किती दुबळं !

**कोकिला०**—असा धांदरटपणा करूं नका. हें पहा, बाबा आत्तांच हरभटाबरोबर साहेबांच्या वाड्यावर गेले आहेत, अन् मला त्यांचीं बोलणीं ऐकूं आलीं त्यावरून ते इतक्यांत परत येणार नाहींत खास. पुढच्या दारीं जा. दाराला कुलूप असेल. एका धोंड्याच्या घावानं त्याची दांतखीळ उघडा अन्—आलं लक्षांत ?

**पंचम०**—आलं. आतां एका क्षणांत कुलूप फोडतों अन् दुसऱ्या क्षणीं माझ्या साहसाची हकीकत तुला सांगतों.

[ पंचम जातो. पडदा पडतो. कुलूप फोडून दार उघडल्याचा आवाज होतो. पंचम व कोकिला बोलत बोलत प्रवेश करतात. ]

**पंचम०**—समजलीस !

**कोकिला०**—काय, सांगतां काय तुम्ही हें ? खरंच कां तुम्ही ही गोष्ट केलीत ?

**पंचम०**—खरं म्हणजे ? गुप्त आहे पण तुला म्हणून सांगितली. विठ्ठलपंतांना विचार वाटलं तर. अन् लांब कशाला, आतां रविकान्ताला शिक्षा होते कीं नाहीं बघ.

**कोकिला०**—देवा, देवा, काय हो केलंत हें ?

**पंचम०**—शाबास ! माझ्या पराक्रमाची हकीगत ऐकून सुरेल सारंगी-सारखी बोलशीलसं वाटलं होतं, ते तूं उलट नापसंतीचे बदसूर काढीत आहेस !

**कोकिला०**—शुद्ध गवई आहांत. माझ्या प्रेमासाठीं साहस केलंत पण ताईसाहेबांच्या प्रेमावर घाला घातलांत ना. छे छे ! मी अश्शी धांवत जातें अन् या चांडाळ कारस्थानाची बातमी—

**पंचम०**—अग पण विठ्ठलपंतांनीं मला पिस्तुल दाखवून—

**कोकिला०**—चुलींत गेलं तुमचं पिस्तुल. सोडा. जाऊं दे मला.

**पंचम०**—अग पण !—ए कोकिले !—गेलीच कीं ! चांगलं. म्हणजे हिच्यासाठीं मीं कधीं नव्हे तें साहस केलं, अन् तें पुरतं ऐकून घ्यायचीही हिला फुरसद नाहीं. गवई गातो जिवानिशीं अन् ऐकणार म्हणतो गप बसायला काय घेशी ! ठीक. देवा, आम्हां गवयांचं नशीब आमच्या तंबो-ऱ्याप्रमाणें सदा गवसणींत घातलेलंच कां रे असायचं ! [ जातो. ]

[ पडदा ]

---

## प्रवेश ३ रा

[ श्रीमंतांच्या खास बैठकीच्या दालनाच्या बाहेरचा व्हरांडा.
कान्ता व तारा बोलत उभ्या आहेत. ]

**तारा०**—तूं इतकी भित्री असशीलसं वाटलं नव्हतं मला. नव्या श्रीमंतांची समक्ष भेट घ्यायची कल्पना मीं काढली तेव्हां रविकान्तांच्या सुटकेसाठीं वाटेल तें करीन असं तूंच म्हणालीस ना ! अन् आतां इथं आल्यावर अन् आपण आल्याची वर्दीसुद्धां आंत श्रीमंतांपर्यंत गेल्यावर, त्यांच्याशीं काय बोलायचं तें तूंच बोल असं मला म्हणतेस कां !

**कान्ता०**—तारे, मीं तसं म्हटलं तें भीतीनं नाहीं. श्रीमंतांजवळ न्याय मागायला मी भीन असं तुला वाटतं ! पण या कारस्थानी सर्पोनीं नव्या श्रीमंतांच्या कानाचा चावा घेतला असला म्हणजे आपल्याला कोठून न्याय मिळणार अशी शंका येते. आणि मग जीव जड होतो अन् वाटतं, श्रीमंतां-जवळ न्याय मागण्यापेक्षां दयाघन प्रभूचा धांवा करीत न्यायाची वाट पहावी.

**पद** ( भैरवी; त्रिताल )

**पदपंकजातें प्रभुच्या वरोनी । मिळतो विसांवा भयशं-कितातें ॥ ध्रु० ॥ नृपति नृपांचा परमेश साचा । झणिं देइ अभया शरणांगतातें ॥ १ ॥**

**तारा०**—असं हताश होणं आपल्याला शोभत नाहीं. देवावर भार टाकणं हाच उत्तम मार्ग म्हटला तरी देवच या वेळीं श्रीमंतांची सद्बुद्धि जागृत ठेवून आपल्याला न्याय देईल असं कां मानूं नये ? देवाच्या दयेचा झरा अखंड वहात आहे खरा; पण आपण प्रयत्नाच्या भांड्यानं त्यांतलं पाणी काढलंच नाहीं तर तें आपल्याला मिळायचं कसं ?

[ म्हातारा श्रीपति पट्टेवाला येतो. ]

दिलीस आमची चिठ्ठी ?

**श्रीपति०**—दिली तर. आत्तां बोलावत्याल तुमास्नी. या शिरपति चोपदारानं ज्येची चिठ्ठी न्येली त्येच्या कामाला वखुत कंधी लागायचा न्हाई. परवां बगा नव सरकार गादीवर आलं तवा दरबारास्न परत वाड्यामंदी आल्यावर मला इचारतात, शिरपती बेट्या तुझ्या मांडीवर न्हानपनीं लई मस्ती केली त्येची याद हये कां तुला ? त्ये ऐकून मी शर-मेनं इरघळून ग्येलों जी. त्ये दिशीं दोनशें रुपयांचा तोडा दिला. असा धनी घावायचा न्हाई दुसरा ?

**तारा०**—हं, खरं आहे तुझं म्हणणं. ( कान्तेस ) नमुनेदार दिसते आहे स्वारी. श्रीमंत गादीवर आले म्हणून अगदीं खुषींत आहे. सारीच प्रजा नव्या श्रीमंतांच्या कारकीर्दीच्या सुरवातीनं आनंदली आहे. नाहीं ?

**कान्ता०**—लोकांची भक्ति श्रीमंतांवर बसली यांत शंकाच नाहीं.

[ आंत एक घंटा घुर्रर्र दिशी वाजते. श्रीपति लगबगीनें आंत जातो व बाहेर येऊन " तुमास्नी आंत बलावलया " असें तारा व कान्ता यांस सांगून त्यांस आंत घेऊन जातो. ]

[ पडदा वर जातो. श्रीमंतांच्या खास बैठकीच्या दालनाचा देखावा. श्रीमंत एका मोठ्या टेबलाशीं कांहीं कागदपत्र पहात बसले आहेत. एका बाजूनें कान्ता व तारा प्रवेश करतात. ]

**श्रीमंत०**—( किंचित् हंसत ) या. बसा. ( त्या दोघी बसल्यावर ) काय ?

**तारा०**—रविकान्तांच्या बाबतींत कांहीं बोलण्यासाठीं आम्ही आपला थोडा वेळ घेणार आहोंत त्याबद्दल माफी असावी.

**श्रीमंत**०--छे ! असं बोलायचं काय कारण आहे ? प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकणं हा वेळेचा सर्वोत्तम व्यय आहे असं मी मानतों.

**कान्ता**०--( तारेस एकीकडे ) पाहिलंस तारे, किती उमदा स्वभाव आहे !

**श्रीमंत**०--बाकी रविकान्ताच्या बाबतींत म्हणाल तर माझं पूर्ण मत बनलेलं आहे. मला जी माहिती आहे ती कुणालाच नाहीं. या प्रकरणांत तुम्ही मला जास्त कांहीं सांगण्याची गरजच नाहीं. काय करायचं तें मीं ठरवलेलं आहे. तें बदलायचं नाहीं.

**कान्ता**०--होय ना ! त्यांचा निर्दोषीपणा आपणांस पटलेला आहे ना ! त्यांची सुटका आपण करणार ना ! मग आम्हांला कांहीं बोलायचं कारणच उरलं नाहीं.

**श्रीमंत**०--न्यायदेवतेच्या डोळ्यावर निःपक्षपाताची पट्टी सदा बांधलेली असते. रविकान्ताचं प्रकरण सामान्यांतलं नाहीं हें उघड आहे. त्याच्यावर रीतसर खटलाही न करतां त्याच्या प्रकरणाचा निकाल लावावा असा नानासाहेबांचा आग्रह आहे. मलाही तसंच वाटतं. आतां नानासाहेब इथें येतील. तुमच्या देखतच मी हुकमावर सही करतों. बसा.

**कान्ता**०--( तारेस एकीकडे ) झालं ! तारे, शेवटीं माझा दुष्ट संशय खरा ठरला; पाहिलंस !

**तारा**०--( कान्तेस एकीकडे ) अग निराश काय होतेस ! आपण वाद घालायला कमी करतां कामा नये. मी तर दोन उणीं उत्तरं तरी बोलून घेईन अन् मग उठेन. ( उघड ) आपल्या न्यायप्रीतीची कीर्ति ऐकून मोठ्या आशेनं आम्ही आलों होतों.

**श्रीमंत**०--त्या न्यायप्रीतीमुळेंच मला असं वागावं लागत आहे. ( श्रीपती येऊन मुजरा करतो. ) काय रे !

**श्रीपती**०--नानासाहेब आल्याती.

**श्रीमंत**०--येऊं दे आंत.

[ श्रीपति मुजरा करून जातो. ]

**कान्ता**०--( एकीकडे ) तारे, चल जाऊं. त्यांच्या शिक्षेचा हुकूम

लिहिलेला पाहाण्याची विटंबना मला सहन व्हायची नाहीं. नानासाहेबाचं तोंडसुद्धां पाह्यची माझी इच्छा नाहीं. ऊठ, चल.

**तारा०**—( एकीकडे ) थांब ग. येऊं दे त्या नीचाला. त्यालाही दोन झणझणीत उत्तरं केल्याचं सुख मला घेऊं दे. बैस. थांब.

[ नानासाहेब प्रवेश करतात. श्रीमंत त्यांना बसायची खूण करतात व ते बसतात. कान्ता व तारा यांना पाहून ते आश्चर्यचकित होतात व आपलें आश्चर्य ते श्रीमंतांस दर्शवितातही. पण श्रीमंत तिकडे दुर्लक्ष केल्यासारखें करतात त्यामुळें ते जरा खजील होतात. ]

**नाना०**—( स्वगत ) हा असा अकल्पित गादीवर आला नसता तर आजची अडचण कशाला आली असती ? रविकान्ताला तुरुंगांत कायमचा डांबला असता. पण आतां याची संमति मिळवल्याशिवाय गति नाहीं. हा अकस्मात् गादीवर आला म्हणून सारी प्रजा आनंदोत्सव करीत आहे. पण माझा संताप मला माहीत. आतां युक्तीनं ताबडतोबीच्या कैदेच्या हुकुमावर याची सही मिळवलीच पाहिजे. ( उघड ) पाहिले ना सरकारनीं रविकान्ताच्या प्रकरणाचे सारे कागद ? हुकूम जितक्या लवकर सुटेल तितका बरा.

**श्रीमंत०**—ठीक आहे. हा मी हुकूम लिहितों. ( लिहिण्यासाठीं वांकतात. )

**कान्ता०**—( एकीकडे ) तारे, तारे, जगांतलं जुलमी युग संपण्याची आशा बाळगणारीं आपण सारीं वेडी नाहीं कां ?

**तारा०**—सरकार, तो हुकूम लिहिण्यापूर्वी माझे दोन शब्द ऐकलेच पाहिजेत.

[ श्रीमंत तिच्याकडे एकदां पाहतात व मग पुन्हां लिहिण्यासाठीं टांक सरसावतात. ]

**नाना०**—( विजयी व कुत्सित स्वरानें ) हंः ! बायकांचा बोलभांडपणा तात्यासाहेबांच्या घरांत खपत असेल, किंवा एकाद्या दरिद्रि चळवळ्याच्या खोपटांत रुचत असेल. हा सरकारी वाडा आहे.



**श्रीमंतः**—शास्त्रज्ञमंडळाकडून मिळणाऱ्या बक्षिसापेक्षांही हें बक्षिस तुम्हांला अधिक प्रिय आहे, नाहीं ?

[ पृष्ठ ९२

**तारा०**--तुमच्यासारखे खलपुरुष ज्या अर्थी इथं आहेत त्या अर्थी हें नृगांगण आहे हें उघडच आहे.

**श्रीमंत०**—ताराबाई ! ( गप बसण्याची खूण करतात. )

**नाना०**—( स्वगत ) मला वाटलं होतं त्यापेक्षां फारच सहज रीतीनं हा बळला. ( उघड ) या साऱ्या गोष्टींच्या मुळाशीं रविकान्त आहे. सरकार, त्या हुकुमांत शक्य तितकी जास्त कैदेची शिक्षा लिहावी.

**श्रीमंत०**—तुम्ही अगदीं फिकीर करूं नका. अपराध्याला शिक्षा देण्यांत माझ्याकडून विलंब कधींच व्हायचा नाहीं. बघा ! ( टेबलावरची घंटा वाजवितात. )

[ त्याबरोबर चार शिपाई प्रवेश करतात व नानासाहेबाला पकडतात. नानासाहेब गांगरून आश्चर्यानें पहात राहतात.]

**तारा०**—सरकार, आपल्या न्यायप्रीतीला द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील. आम्ही हें शिष्टमंडळ घेऊन ज्या कार्यासाठीं आलों होतों तें अशा रीतीनं साध्य झाल्याबद्दल आम्हांला जो आनंद होत आहे तो शब्दांनीं व्यक्त करणं शक्य नाहीं.

**नाना०**—सरकार, गैरसमजानं संन्याशाला सुळीं—

**श्रीमंत०**—नानासाहेब, गैरसमजानं मी कांहीं करीन हा तुम्हांला संशय नको. रविकान्ताच्या शिक्षेचा हुकूम लिहायसाठीं मी टांक उचलला असा तुमचा जो समज झाला तोच गैरसमज होता. रविकान्ताला मुक्त करून मधांशींच वाड्यावर आणून ठेवण्यांत आलं आहे. त्याच्या मुक्ततेचा हुकूम दप्तरीं दाखला व्हायला पाहिजे म्हणून तुमच्या फायलीवर मी शेरा मारला इतकंच.

**नाना०**--सरकार, रविकान्ताच्या चळवळीनं प्रजेंत केवढी बेदिली माजली होती ! ती अशानं वाढेल, सरकार.

**श्रीमंत०**--प्रजेच्या हिताची किती काळजी तुम्हांला !

**तारा०**--बोला, कारभारी, आतां बोला कीं !

**कान्ता०**—( एकीकडे ) तारे, हें बरं नाहीं अं. सरकार मनांतनं हंसतील आपल्याला अशानं.

**नाना०**—( स्वगत ) आतां काय बोलायचं ! चांगलंच चकवलं यानं. ( उघड ) तसं नव्हे सरकार. पण—अं—

**श्रीमंत०**—तुम्ही न सांगतांच मी समजूं शकतों साऱ्या गोष्टी नानासाहेब. खरं सांगायचं म्हणजे या रविकान्ताच्या प्रकरणांत तुम्हांला खाजगी वैर साधायचं आहे. दुसरं कांहीं नाहीं.

**तारा०**—अगदीं हेंच खरं !

**कान्ता०**—( एकीकडे ) तारे, हें काय असं !

**नाना०**—सरकारचा कांहीं तरी गैरसमज झाला आहे. या प्रकरणीं खाजगी गोष्टींचा कांहींच संबंध नाहीं. रविकान्ताच्या चळवळीनं प्रजेचं अंतीं नुकसान होणार ही गोष्ट वास्तविक उघड आहे. आणि ती बाब क्षणभर बाजूला ठेवली तरी चोरून दारू गाळण्याचा त्याचा अपराध काय कमी महत्वाचा आहे ! त्याच्या प्रयोगशाळेच्या अन् शास्त्रीय शोधाच्या सोंगावर जाऊन उपयोग नाहीं.

**श्रीमंत०**—तुमच्या कोत्या बुद्धीची कींव येते नानासाहेब. रविकान्ताचे शोध तुम्ही केवळ ढोंग समजता ! मीं एक बातमी अजून कोणाला सांगितली नव्हती ती ऐका तर. आज विलायतेंतून जिनीव्हा येथून दोन तारा माझ्या हातीं आल्या. एक रविकान्ताच्या नांवची व एक माझ्या नांवची होती. क्षयरोगाचा कायम प्रतिबंध करणारी जी लस शोधून रविकान्तानं शास्त्रज्ञमंडळाकडे पाठविली होती ती मान्य होऊन त्याला मोठं पारितोषक मिळाल्याचं त्याच्या तारेंत होतं; व मला आलेल्या तारेंत आमच्या राज्यांत असा एक असामान्य शोधक असल्याबद्दल माझं अभिनंदन केलं होतं. या तारा आल्यापासून रविकान्ताचं समक्ष अभिनंदन केव्हां करीन असं मला झालं आहे. [ टेबलावरची घंटा वाजवितात. त्याबरोबर एक पट्टेवाला आदबीनें

रविकान्तास घेऊन येतो. युवराज पुढें होऊन रविकान्ताशीं हस्तांदोलन करतात. ] तुमचं मी मनःपूर्वक अभिनंदन करतों. तुमचं रसायन मान्य होऊन तुम्हांला शास्त्रज्ञमंडळाचं बक्षीस मिळालं आहे.

**रवि०**—खरं ! आपण अकस्मात् भेटलांत, तुरुंगांतून माझी सुटका एकाएकीं झाली, अन् माझं रसायन मान्य झाल्याची बातमी आपल्या तोंडून अकल्पित कळली—मी अगदीं गोंधळून गेलों आहे ! ( जवळ जाऊन कान्तेस ) आईचं कसं आहे !—बरं आहे ! वा ! आयुष्यांत एखादे वेळीं आनंदाच्या अशा लाटा एकदम अंगावर येतात कीं त्या माणसाला भांबावून सोडतात.

**श्रीमंत०**—काय नानासाहेब ! रविकान्ताच्या निर्दोषित्वाबद्दल पटली ना समजूत !

**नाना०**—मुळीं अनुकूल ग्रहानं रविकान्ताकडे पाह्यचं ठरविल्यामुळं त्याचा अपराध सरकारनां दिसत नाहीं. त्यानं चोरून गाळलेल्या दारूच्या पेट्या आम्ही त्याच्या घरांतून काढल्या त्याचं कांहींच महत्त्व नाहीं !

**श्रीमंत०**—आहे तर ! त्याचं इतकं महत्त्व आहे कीं त्यासाठींच तर तुम्हांला गिरफदार केलेलं आहे ! ( टेबलावरची घंटा दाबतात. )

[ दोन शिपाई पंचम व कोकिला यांस घेऊन येतात. ]

या कोकिलेमुळं मला तुमचं कारस्थान कळलेलं आहे. साक्षीपुराव्याची उणीव नको म्हणून या गवयाला पकडून इथें आणून ठेवण्यांत आलं होतं. ज्या पेट्या रविकान्ताच्या घरांतून काढल्या म्हणून तुम्ही ओरडतां त्या या गवयाकडून तुमच्या कारकुनानं आधीं तेथें टाकविल्या होत्या. आतां तुमचं कांहीं म्हणणं शिल्लक आहे !

**नाना०**—( स्वगत ) विठ्ठलपंतानं असा मूर्खपणा केला असेल ही कल्पना नाहीं. हस्तकांचा मूर्खपणाच शेवटीं कारस्थान करणाऱ्यांचा घात करतो हेंच खरें !

**कोकिला०**—सरकार, पंचमांनीं हें काम केवळ भाबडेपणानं केलं. त्यांना शिक्षा होऊं नये. मी पायां पडतें.

**श्रीमंत०**—ऊठ. पायां पडायचं काय कारण ? त्याला मी मुक्त करणारच आहे. रविकान्त, आजपर्यंत तुम्हांला व्यर्थ त्रास झाला. त्याचं परिमार्जन व्हावं म्हणून मी दोन गोष्टी करतों. एक, आजपासून या आपल्या राज्यांत पूर्ण दारूबंदी झाली असं मी जाहीर करतों. आणि दुसरी, केवळ वंशपरंपरेनं मिळणाऱ्या जहागिरी अन् सरदारक्या यापुढं माझ्या राज्यांतून नष्ट होतील अशीही व्यवस्था मी लवकरच करतों.

**रवि०**—प्रजेच्या सुखाविषयींची आपली ही तत्परता पाहून माझं अंतःकरण सद्गदित होत आहे.

**श्रीमंत०**—पण मलाही उलट तुमच्याजवळ एक गोष्ट मागायची आहे.

**रवि०**—आज्ञा व्हावी.

**श्रीमंत०**—माझ्या राज्याची दिवाणगिरी तुम्ही स्वीकारावी. तुमच्यासारखा विद्वान आणि विख्यात दिवाण असणं हें माझ्या राज्याला भूषण होईल.

**रवि०**—सरकार, लोकांची निरपेक्ष सेवा करण्याची माझी इच्छा आहे. लोकसेवेच्या व्रताला सत्तेचं लेणं वावडं असतं. येवढा आग्रह सरकारनीं करूं नये. साधा प्रजाजन या नात्यानं मी सेवेला केव्हांही हजर आहेच.

**श्रीमंत०**—जशी तुमची इच्छा. पण आतां विलंब न करतां तुमचं वैयक्तिक सौख्य मला पूर्ण करूं द्या. ( कान्तेस ) या, इकडे या. मला साऱ्या गोष्टी माहित आहेत. ( तिचा हात रविकान्ताच्या हातीं देत ) माझ्या या भगिनीचा स्वीकार करा. शास्त्रज्ञमंडळाकडून मिळणाऱ्या बक्षिसापेक्षांही हें बक्षीस तुम्हांला अधिक प्रिय आहे, नाहीं ? ( कान्तेकडे पाहून ) मघाशीं प्रथम माझ्या विनोदानं जरा रागावलां असाल. आतां गेला ना राग ?

**कान्ता०**—महाराज, साऱ्या दृष्टीनीं सुखाचं असं हें युगान्तर सुरू झाल्यावर रागाला किंवा खेदाला अवकाश कुठला ?

**श्रीमंत०**—तुमचं आणखी कोणतं इच्छित मला करण्यासारखं आहे ?

**कान्ता०**—कांहीं नाहीं. या युगान्तरांत स्वतंत्र विचाराची संवय सर्व स्त्रीपुरुषांना व्हावी येवढंच माझं प्रभूजवळ मागणं आहे. स्वतंत्र विचार हेंच सर्व सुखाचं बीज आहे.

**भरतवाक्य** ( सोहनी; चौताल )

**देवो प्रभुवर वर जनांस सकलमनुजाहितसुखनिधान। बंधनाशकर। सुभगसार ॥ ध्रु० ॥ अखिलदुरितअंतकारि। परम विमल चिरसुखबीज । मति स्वतंत्र तेजदायि ओज-दायि। सकल जन वरोत ॥ १ ॥**



# प्रो. फडकेकृत पुस्तकें

## चरित्रें

१. दादाभाई नौरोजी
२. टेरेन्स मॅक्स्विनी
३. डी व्हॅलेरा

## कादंबऱ्या

१. अल्ला हो अकबर
२. कुलाब्याची दांडी
३. जादूगार
४. दौलत
५. अटकेपार

## प्रबंध

१. मानसोपचार
२. मानसोन्नति
३. संततिनियमन
४. आजचे तरुण स्त्रीपुरुष
व त्यांजपुढील प्रश्न

## नाटक

१. युगान्तर

## इंग्रजी

1. Sex Problem in India
2. Psycohoolgy
3. Elements of Ethics